# हरि गोविंद केळकर ह्यांचे जीवन दर्शन

## रत्नाकर हरी केळकर

*(र. ह. केळकर ह्यांनी लिहिलेल्या व १९५९ मध्ये ज्ञानोदय मासिकाच्या आठ अंकांत क्रमशः प्रकाशित झालेल्या लेखमालेचे आणि त्यांच्या काही अप्रकाशित हस्तलिखितांचे हे संकलन आहे.)*

### १
### पार्श्वभूमी

माझे वडील हरिपंत केळकर आपल्या वयाच्या ४४व्या वर्षी व माझ्या वयाच्या चवथ्या वर्षी इहलोक सोडून गेले. त्यावेळी आम्ही अलिबागेस रहात होतो. तो काळ त्यांच्या जीवनातील शेवटचा टप्पा होता. आमचे वडील आम्हाला आठवत नाहीत एवढीच आम्हा मुलांची त्यांच्याविषयी आठवण होती. दूरवर रस्त्याच्या टोकाकडे दृष्टी जावी, क्षितिजात मिळत जाणाऱ्या त्या टोकाशी एखाद्या वाटसरूची पाठमोरी अंधुक आकृती दिसावी व दिसताच दिसेनाशी व्हावी आणि पुढे दिगंताकडे टक लावूनसुद्धा काही दिसू नये अशीच काहीशी आमची अवस्था झाली.

पण आईचा आधार राहिला होता. त्या काळातील आठवणी हृदयात खोलवर जाऊन राहिल्या आहेत. आईचे ऋण फिटत नाही म्हणतात ते खरे आहे. माझ्या अंतःकरणात ते रुजू आहे. ह्या आसऱ्यात १४ वर्षांचा काळ झरकन निघून गेला व पुढे तोही आसरा अकस्मात तुटला. प्रसंगानुसार आईच्या तोंडून वडिलांच्या आठवणी निघत. त्यांनी रचलेली भक्तिगीते ती अनेक वेळा गात असे. पण तेवढ्यावरून त्यांचे जीवन चरित्र लिहून काढणे शक्य नव्हते. संशोधनपूर्वक प्रयत्न करून त्यांच्याविषयी सविस्तर माहिती मिळवून संग्रहित करावी असे विचार अनेक वेळा माझ्या मनात येत. पण अनेक वर्षे तसे प्रयत्न करणेसुद्धा शक्य झाले नाही. शेवटी ३० ऑक्टोबर १९५४ हा दिवस आला आणि पोलादपूरचे स्मारक मंदिर खुले करण्यात आले. ज्यांच्या स्मरणाप्रीत्यर्थ ते बांधले गेले ते डॉनल्ड मिचेल व हरिपंत केळकर या दोघांच्या जीवन कार्याविषयी मिळेल तितकी माहिती संग्रहित करून प्रसिद्ध करावी म्हणून मी प्रयत्न करू लागलो.

काळाचा अहर्निश क्रम अव्याहत चालू असता मानवी भवितव्यातील एकेक दिवस वर्तमानात येऊन भूतकाळाच्या स्मृतीत मागे लोटला जातो. पण मानवी जीविताची तीच गत असल्यामुळे पिढ्यामागून पिढ्या निघून जातात आणि मनोगत स्मृती विस्मरणात विलीन होतात. तथापी मनुष्याची नजर चालता चालता मागे वळून पहाणाऱ्या सिंहाच्या नजरेसारखी पाठमोरी फिरत असते. हेच सिंहावलोकन, हीच इतिहासाची नजर, आणि ह्याच नजरेने मनुष्याला हर्षखेदादी भावनांच्या पलीकडे गेलेल्या भूतकाळाचे दर्शन होते.

## २
## पूर्वीचा कुलाबा (आताचा रायगड) जिल्हा ः भौगोलिक परिस्थिती व इतिहास

कुलाबा नावाचे गाव कुठेच नाही. हे नाव अरबी भाषेतील कालाबेल ह्या शब्दावरून पडले असावे असे म्हणतात. कालाबेल म्हणजे समुद्रात शिरणारा जमिनीचा चिंचोळा भाग. असा एक भू-भाग अलिबागच्या किनाऱ्यालगत आहे व त्या ठिकाणी कुलाबा किल्ला आहे. हा समुद्रावरचा पहारेकरी कुलाबा किल्ला मराठ्यांच्या आरमारी सत्तेची साक्ष देत आहे.

कुलाबा किल्ल्याचे नाव कुलाबा जिल्ह्यास मिळाले आहे. याच्या पूर्वेस सह्याद्रीच्या रांगा म्हणजेच पश्चिम घाट व घाटातील पुणे व सातारा हे जिल्हे, पश्चिमेस अरबी समुद्र, उत्तरेस ठाणे जिल्हा व मुंबई, आणि दक्षिणेस बाणकोटची खाडी व पलीकडील रत्नागिरी जिल्हा, अशा या जिल्ह्याच्या चतुःसीमा आहेत. अशा ह्या जिल्ह्याची दक्षिणोत्तर लांबी ७० मैल व पूर्वपश्चिम रुंदी ३० मैल आहे.

पूर्वेकडील सह्याद्री व पश्चिमेकडील समुद्र ह्यांमधील ही कोंकणभूमी सदा नव्याने नटलेली असते. समुद्राच्या भरती-ओहोटीशी मिळते घेऊन नागमोडीने वाहणाऱ्या नद्या व खाड्या वाऱ्याच्या हेलकाव्यात डुलणाऱ्या नारळी-पोफळीच्या बागा पाहून मन मोहून जाते. अशा नारळी-पोफळीच्या बागेलाच आगर म्हणतात. कुलाबा जिल्ह्याच्या समुद्र किनाऱ्याला अशा बागांची रांगच रांग लागलेली आहे व म्हणून या प्रांताला अष्टागर प्रांत असे नाव पूर्वीपासून पडलेले आहे. अष्टागरातील आठ गावे म्हणजे आवास, किहीम, थळ, अलिबाग, आक्षी, नागाव, चौल व रेवदंडा ही होत. हाच अलिबाग तालुक्याचा समुद्रकिनारा. अलिबाग, पेण, पनवेल, कर्जत, रोहे, माणगाव व महाड हे कुलाबा जिल्ह्यातील सात तालुके. १९४८ साली संस्थानांच्या विलीनीकरणात भोर संस्थानातील सुधागड पेटा व जंजिरा संस्थानातील मुरूड, श्रीवर्धन व म्हशेळे हे तिन्ही महाल* कुलाबा जिल्ह्यास जोडण्यात आले.

कुलाबा जिल्ह्यातील गाढी नदी, पाताळ गंगा (व तिला मिळणारी भोगावती), अंबा, कुंडलिका व सावित्री (व तिला मिळणारी काळ नदी) ह्या साऱ्याच नद्या पूर्वेकडे सह्याद्रीत उगम पावून पश्चिमेकडे वहात वहात अरबी समुद्रास मिळतात. ह्या सर्व नद्यांच्या मुखांतून समुद्राचे पाणी आत जाते व त्यामुळे पनवेल, आपटे, धरमतर, रोहे व बाणकोट ह्या खाड्या झाल्या आहेत. सावित्री नदी महाबळेश्वरच्या डोंगरांत उगम पावून पोलादपूर, महाड व दासगाव ह्या गावांवरून वहात येत बाणकोटजवळ समुद्रास मिळते. बाणकोटची खाडी हीच कुलाबा जिल्ह्याची दक्षिण सीमा. ह्या सगळ्याच खाड्यांतून जहाजाने जिल्ह्यातील मुख्य मुख्य ठिकाणी जाता येत असे. पनवेलीपर्यंत असा प्रवास करून पुढे खोपोली ते खंडाळा ह्या बोरघाटाच्या मार्गाने पुण्यास जाता येत असे, व महाडपर्यंत बाणकोटच्या खाडीतून प्रवास करून पुढे पोलादपुलावरून पारघाटाच्या मार्गाने साताऱ्यास जाता येत असे.

आधुनिक लोहमार्गाच्या युगास सुरुवात झाली नव्हती त्यावेळी ह्या घाटांचे फार महत्त्व असे. ह्या पश्चिम घाटात प्रतापगड व रायगड हे मराठ्यांच्या राजवटीत उभारलेले डोंगरी किल्ले आहेत. ते दोन्ही किल्ले पोलादपूर-महाडच्या अगदी जवळ आहेत. पोलादपूर व सातारा यांमधील पारघाटाचा मार्ग प्रतापगडाने रोखून धरला आहे.

---

* तालुक्याचा पोटभाग

बाणकोटच्या खाडीतून महाडपर्यंत पोचण्याचा मार्ग असल्यामुळे शक्य असलेल्या आक्रमणाला सामना देण्याच्या सामर्थ्याने रायगड उभा आहे.

पण कधीतरी या मार्गावरून देवराज्याचे सेवक येतील अशी त्यावेळी कोणाला कल्पना असेल? आणि असती तर मानवी मनोरथ व ईश्वरी योजना यांत काय फरक राहिला असता?

एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या पंचविशीत पहिले, व शेवटच्या पंचविशीत दुसरे, असे दोन देवराज्याचे सेवक बाणकोटच्या खाडीतून पोलादपुरास गेले. पहिल्याची प्राणाहुती व दुसऱ्याची प्रेमसेवा सार्थकी लागली आणि पोलादपूरचा पाया घातला गेला. पोलादपूर हेच त्यांच्या स्वामीनिष्ठेचे स्मारक झाले. तेच डॉनल्ड मिचेल व हरिपंत केळकर.

## ३
## पोलादपूर (१८२३): डॉनल्ड मिचेल

हिंदुस्थानात पाठविलेल्या स्कॉटलंडदेशीय धर्मोपदेशकांपैकी रेव्हरंड डॉनल्ड मिचेल हे पहिले होते. मुंबईच्या विल्सन कॉलेजचे माजी प्राध्यापक रेव्ह. डॉ. डी. मकीखन ह्यांनी त्यांच्या जीवनकार्यावर प्रकाश पाडणारा 'हा खरा वधस्तंभाचा वीर' ह्या शीर्षकाचा एक लेख ज्ञानोदय साप्ताहिकाच्या ५ एप्रिल १९२३ च्या अंकात लिहिला, ज्याचा अनुवाद खाली दिला आहे.

> १९२३ हे वर्ष स्कॉटलंडदेशीय धर्मोपदेशकांनी हिंदुस्थानात एक संपूर्ण शतकभर केलेल्या परिश्रमाचे दर्शक होय. १८३० साली ॲलेक्झांडर डफ हे कलकत्त्यास उतरले त्या दिवसापासून हिंदुस्थानात स्कॉटलंडदेशीय धर्मोपदेशकांच्या प्रयत्नास सुरुवात झाली अशी स्कॉटलंडमधील ख्रिस्ती मंडळ्यांची सर्वसाधारण समजूत होऊन गेली होती. पण सहजगत्या विस्मरणाच्या आड गेलेली खरीखुरी सुरुवात नेर्न येथील धर्मसभेने दीक्षा देऊन स्कॉटिश मिशनरी सोसायटीने पश्चिम हिंदुस्थानात पाठविलेले डॉनल्ड मिचेल हे जेव्हा मुंबईस २ जानेवारी १८२३ ला जमिनीवर उतरले तेव्हाच झाली होती.
>
> मी १८७५ साली हिंदुस्थानात आल्यावर काही आठवड्यांनी मला पश्चिम घाट व हिंदी महासागर यांच्यामध्ये समुद्रकिनाऱ्यालगतच्या सखल सपाटीवर शेकडो मैलपर्यंत पसरलेल्या कोंकणपट्टीतून प्रवास करण्याची पाळी आली. मुंबईच्या दक्षिणेस १०० मैलांवर सावित्री नदीच्या डाव्या काठालगत अगदी चित्रासारख्या वसलेल्या पोलादपूर गावात मी प्रवेश करताच एका मोकळ्या जागी झाडांच्या राईजवळ एकाकी उभ्या असलेल्या एका दगडाकडे माझे लक्ष वेधले गेले. जवळ जाताच मला आढळून आले की, सन्मान्य ईस्ट इंडिया कंपनीच्या सेवेत अधिकारी असताना ज्यांनी हिंदुस्थानातील लोकांत धर्मोपदेशक बनून राहण्याकरता आपल्या अधिकारपदाचा त्याग केला आपल्या धर्मोपदेशाच्या सेवेतल्या पहिल्याच वर्षी २० नोव्हेंबर १८२३ ला ज्यांना पोलादपुरास मरण आले असे रेव्हरंड डॉनल्ड मिचेल ह्यांचे अंतविश्रामाचे ते ठिकाण होते असे त्यावर कोरलेल्या लेखाने जाहीर करणारा तो एक कबरेवरचा दगड होता.
>
> स्कॉटलंडदेशियांच्या धर्मप्रसारकार्याच्या इतिहासातील विस्मरणात गेलेल्या ह्या घटनेविषयी मला अधिक माहिती मिळावी म्हणून मी खटपट केली. मला माहिती मिळाली ती अशी की, नेर्नच्या जवळच असलेल्या

आर्डलॅक गावच्या ख्रिस्ती मंडळीच्या आचार्यांचे डोनल्ड मिचेल हे चिरंजीव, स्वतः चर्च ऑफ स्कॉटलंडच्या आचार्यपदाच्या सेवेत प्रविष्ट होण्यासाठी ईश्वरपरिज्ञानाविषयक अभ्यासक्रम पुरा करीत असता त्यांना त्या चर्चच्या धर्मसिद्धांतांना मनःपूर्वक मान्यता देता येईना व म्हणून आचार्यपदाच्या सेवेचा मार्ग सोडून धर्मव्यतिरिक्त व्यवसायात जाण्यासाठी त्यांनी ईस्ट इंडिया कंपनीच्या लष्करात अधिकारी म्हणून नोकरी पत्करली.

१८११ ते १८२० च्या दरम्यान ह्या नोकरीत असताना गुजरातच्या एका जिल्ह्यात काम करीत असलेल्या लंडन मिशनरी सोसायटीच्या धर्मोपदेशकाशी त्यांचा निकट संबंध जडला. पुढे ह्या जिल्ह्यातील काम आयरिश प्रेसबिटेरियन चर्चच्या स्वाधीन करण्यात आले. ह्या संयोगाने त्यांचा लोपलेला धर्मभाव त्यांना पुन्हा लाभला व धर्मोपदेशक बनून येण्याचा त्यांनी तत्काळ निश्चय केला. १८२० साली स्कॉटलंडास परत जाऊन त्यांनी ईश्वरपरिज्ञानाचा आभ्यासक्रम पुरा केला व नेर्नच्या धर्मसभेने २१ जून १८२२ रोजी त्यांची दीक्षा केली.

स्कॉटिश मिशनरी सोसायटीने हिंदुस्थानात मिशन सुरू करण्याचे निश्चित केले त्याच्या अगोदरच सोसायटीने इराणात काम सुरू केले होते, तेथून मुंबई इलाखा जवळ होता व हिंदुस्थानच्या ह्या भागात इतर मिशनरी संस्थांची पूर्वस्थापना क्वचितमात्र झाली होती, म्हणून ह्या सोसायटीने पश्चिम हिंदुस्थान हेच आपले कार्यक्षेत्र नियोजित केले. डॉनल्ड मिचेल यांनी आपल्या दीक्षेच्या अगोदर या सोसायटीला आपली सेवा स्वीकारण्याची विनंती केली होती. त्यांची साधुवृत्ती, त्यांचा भक्तिभाव, त्यांचा हिंदुस्थानातील अनुभव व त्यांचे तेथील भाषांचे ज्ञान या सर्व कारणांमुळे ह्या मिशन कार्यासाठी ते अगदी सुसज्ज असल्याने त्यांच्या विनंतीचा ह्या सोसायटीने स्वागतपूर्वक विचार केला व परराष्ट्रीयांसाठी धर्मोपदेशक म्हणून त्यांची दीक्षा करण्यात आली.

त्यांची दीक्षा झाल्यानंतर ऑगस्ट १८२२ मध्ये ते 'सारा' जहाजाने मुंबईस रवाना झाले. त्यांच्या पहिल्या पत्रात डाउन्समध्ये काही दिवस विलंब झाल्यानंतर १९ ऑगस्टला पोर्टसमाउथवरून पुढे गेल्याचा त्यांनी उल्लेख केला होता. जवळ जवळ पाच महिन्यांच्या प्रवासानंतर 'सारा' जहाज २ जानेवारी १८२३ ला मुंबईस लागले.

हे मिशन हिंदुस्थानच्या दक्षिण प्रांतात प्रस्थापित करून पुण्यास त्याचे प्रमुख केंद्र करावे असा सोसायटीचा उद्देश होता. पण पुणे व त्याच्या आसपासचा मुलूख नुकताच ब्रिटिश अंमलाखाली गेला असल्यामुळे ह्या नवीनच खालसा केलेल्या मुलखात धर्मोपदेशाचे काम सुरू करण्यास परवानगी देणे गव्हर्नरांना उचित वाटेना. मुंबईच्या दक्षिणेस सावित्रीच्या मुखाशी वसलेले बाणकोट अथवा व्हिक्टोरिया फोर्ट या ठिकाणी काम सुरू करण्यास त्यांनी मान्यता दिली. हे ठिकाण निरोगी समजले जात होते. पण एखाद्याने व्हिक्टोरिया फोर्टमध्ये इंग्रजांच्या कबरस्थानात जाऊन तेथील अधिकारी, त्यांच्या बायका व विशेषेकरून लहान मुले ह्यांची मृत्युसंख्या दाखविणारे दुःखदायक दाखले पाहिले तर त्याला हे विधान ऐकून नवल वाटेल.

त्या ठिकाणी डॉनल्ड मिचेल गेले. १३ मार्च १८२३ ला ते बाणकोटास जमिनीवर उतरले आणि थोड्याच अवधीत त्यांनी कामास सुरुवात केली. सभोवारच्या खेड्यांत त्यांनी अनेक शाळा उघडल्या, व त्यांत मराठी भाषेतील पवित्र शास्त्राच्या पुस्तकांचा ते पुष्कळच उपयोग करू लागले. जुलैपर्यंत एकंदर हजेरीसंख्या ४०० पर्यंत गेली होती असे त्यांना आपल्या अहवालात कळविता आले.

२८ नोव्हेंबर १८२२ रोजी लेडी ग्लेनॉरखीज चॅपेल, एडिनबरो, येथे ज्या तीन धर्मोपदेशकांची दीक्षा झाली त्यांच्यापैकी दोघांच्या आगमनाने त्या वर्षी ऑक्टोबर महिन्यात ह्या मिशनला साहाय्यक सहकारी मिळाले. ते तिघे रेव्ह. जॉन कूपर, रेव्ह. ॲलेक्झांडर क्रॉफर्ड व रेव्ह. जेम्स मिचेल हे होते. ते मार्च १८२३ ला जहाजाने रवाना होऊन मुंबईला त्या वर्षीच्या ऑगस्टमध्ये येऊन पोहोचले. रेव्ह. जेम्स मिचेल यांना काही दिवस मुंबईत मागे रहावे लागल्यामुळे त्या वर्षी थोड्या उशिरा ते बाणकोट मिशनला जाऊन मिळाले. हे दोन सहकारी आल्यानंतर लवकरच डॉनल्ड मिचेल यांना न हटणाऱ्या तापाने पछाडले. मुंबईला नेल्यामुळे त्यांना उत्तम व्यवस्था व कुशल वैद्यकीय उपचार ह्यांचा फायदा मिळाला. तरी पण प्रकृती सुधारण्याचे काही चिन्ह दिसेना व अखेरचा उपाय म्हणून रुग्णाइताला दक्षिणच्या अधिक निरोगी हवेवर जाण्याची सूचना करण्यात आली. बाणकोटला परत येऊन आपल्या दोन सहकार्यांबरोबर ते १७ नोव्हेंबरला साताऱ्याकडे जाण्यास निघाले. नदीतून वर २० मैलांपर्यंत होडीने प्रवास करून त्यांना महाडपर्यंत नेण्यात आले, व तेथून पुढे रस्त्याने १० मैलांच्या अंतरावर असलेल्या पोलादपूरपर्यंत नेले. त्यांचा अंत जवळ येऊ लागला होता असे स्पष्ट दिसू लागले आणि २० तारखेला दुपारच्या अगोदर ते विश्राम पावले. शेवटच्या उच्छ्वासात उच्चारलेले त्यांचे शेवटचे शब्द हे होते, ‘परमेश्वराच्या ज्ञानाने पृथ्वी भरेल. आमेन आणि आमेन.’ त्यानंतर मी वर्णिलेल्या ठिकाणी महाबळेश्वरच्या विशाल पर्वतशिखरांच्या सावलीत व तेथे उगम पावून ह्या गावच्या कडेने वहात जाणाऱ्या सावित्रीच्या सुस्वर जलौघाजवळ त्यांना अंत्य विश्रामस्थानी ठेवण्यात आले.

हा खरा वधस्तंभाचा वीर अकाली मरण पावल्याने ह्या इतक्या लवकर होत असलेल्या सूर्योदयाचे तेज ढगाआड झाल्यासारखे दिसू लागले. पण त्यामुळे पुढे येणारी पहाट थांबून राहिली नाही. हा अग्रेसर निघून जाण्याच्या अगोदरच त्याने उतरून ठेवलेला भार उचलून घेण्याकरिता तीन नवीन धर्मोपदेशक आलेलेच होते.त्याच्या मरणानंतर थोड्याच महिन्यांनी रेव्ह. जेम्स स्टीव्हनसन हे एक आले. ह्या पुरोगामी संघात सामील होण्याकरिता १८२६ साली आणखी एक म्हणजे रॉबर्ट नेसबिट हे आले, व त्यानंतर तीन वर्षांनी जॉन विल्सन आले.

या हकीगतीप्रमाणे झालेल्या लहानशा सुरुवातीतून पश्चिम हिंदुस्थानातील मिशनांचा म्हणजे मुंबई व तिच्या सभोवारच्या प्रांतातील मिशन, पुणे व दक्षिण प्रांतातील मिशन, आणि मुंबईच्या शाळेतून ख्रिस्ती झालेले रेव्ह. गणपतराव नवलकर यांनी सुरू केलेले व त्याच शाळेतून ख्रिस्ती झालेले डॉ. नारायण शेषाद्री यांनी प्रस्थापित करून चालू ठेवलेले अतिदक्षिणेतील निजामशाहीच्या मुलखातील मिशन या सर्वांचा उगम झाला.

## ४

## बाणकोट (१८२९): जॉन विल्सन

जॉन विल्सन हे १८२९ साली हिंदुस्थानात आले व बाणकोट मिशनला जाऊन मिळाले. कालांतराने त्यांनी आपले ठाणे बाणकोटहून मुंबईस हालवले आणि त्यांच्या कामाचा व्याप वाढत गेला. तरी महाराष्ट्रीय ख्रिस्ती मंडळीच्या संस्थापनेत बाणकोट मिशनची सेवा साधनीभूत झाल्याशिवाय राहिली नाही. बाणकोट येथे राहत असताना ज्यांना शुभवर्तमान ऐकण्याची संधी मिळाली होती असे दोन भाऊ पुढे मुंबईस आले व अमेरिकन मिशनशी त्यांचा संबंध जडला. त्यांच्यापैकी दाजिबा निळकंठ वैद्य हे १८३० साली बाप्तिस्मा घेऊन अमेरिकन

मिशनच्या मुंबई मंडळीचे पहिले सभासद झाले. पुढे ते अहमदनगरास गेले व १८३३ साली अहमदनगर मंडळीची स्थापना झाली तेव्हा त्या मंडळीचे पहिले सेवक झाले.

जॉन विल्सन व त्यांचे सहकारी मुंबईस आल्यावर त्यांनी 'फ्री चर्च इन्स्टिट्यूट' नामक शिक्षणसंस्था काढली. पुढे ह्याच संस्थेतून विल्सन हाय स्कूल आणि विल्सन कॉलेज ह्या संस्था जन्म पावल्या. पण ह्याच संस्थेतील शिक्षणाने नवा जन्म पावलेले धनजीभाई नौरोजी, नारायण शेषाद्री, बाबा पदमनजी, गणपतराव नवलकर इत्यादींची नावे उल्लेखनीय होत.

गणपतराव नवलकर ह्यांनी १८५६ साली विद्यार्थीदशेत असताना आपल्या वयाच्या अठराव्या वर्षी बाप्तिस्मा घेतला. त्यांनी जालन्यास, मुंबईस व शेवटी अलिबागेस बहुमोल सेवा केली.

## ५
## अलिबाग (१८८०): गणपतराव नवलकर

१८८० साली गणपतराव नवलकर अलीबागेस जाऊन राहिले व कुलाबा जिल्ह्यातील कामास नव्याने सुरुवात झाली. नवलकरांना हरिपंत केळकर सापडले, व हरिपंतांना पेणचे रामचंद्र बाळाजी केसकर गुरू लाभले.

आपल्या सेवानिवृत्तीच्या काळात गणपतराव नवलकरांनी इंग्रजी भाषेत लिहिलेले आत्मचरित्र अप्रकाशित राहिले होते. त्यांतील सहा पृथक् भाग त्यांनी १९०९ ते १९१२ च्या दरम्यान छापून प्रसिद्ध केले. त्यांपैकी A New Departure (नवीन मार्गावर) व An Educational Awakening (शैक्षणिक जागृती) ह्या १९१० साली प्रसिद्ध झालेल्या दोन भागांत नवलकरांनी हरिपंत केळकर ख्रिस्तचरणी कसे आले ही साद्यंत हकीगत व प्रसंगानुसार त्यांच्या आठवणी नमूद केल्या आहेत. तरी त्या केवळ आठवणी असल्यामुळे चरित्रलेखाला लागणारा कालनिर्देश त्यांत झालेला नाही. त्यांच्या ग्रंथातील उतारे अनुवाद रूपाने खाली दिले आहेत.

> मी मुंबईमध्ये करीत असलेल्या कामात समाधान मानून न राहता सभोवारच्या मुलखांत उत्तरेस ठाण्यापर्यंत व दक्षिणेस अलिबागेपर्यंत नियमितपणे काम करण्यास सुरुवात केली. महिन्यातून एकदा मुंबईच्या दक्षिणेस असलेल्या अलिबाग व रेवदंडा ह्या गावी मी जाऊ लागलो. ठाणे उत्तरेस होते. रेव्ह. जॉन विल्सन, रेव्ह. नेसबिट, रेव्ह. मरे मिचेल हे मुंबईहून या मुलखात फेरीवर जात असत.
>
> मी ह्या भागांत जाऊ लागल्यापासून नवीन योजनेस सुरुवात झाली. अलिबागेस एका उपदेशकाची नेमणूक करण्यात आली व त्याने तेथील मराठी शाळेतील धार्मिक शिक्षणाचे काम आपल्या हाती घेतले. रेवदंड्याससुद्धा मी एका ख्रिस्ती उपदेशकाची नेमणूक केली आणि ह्या दोन्ही ठिकाणी नियमितपणे निदान महिन्यातून एकदा तरी मी न चुकता जाऊ लागलो. एकंदर परिस्थिती पालटल्यासारखी दिसू लागली. शाळेत येणाऱ्यांमध्ये संख्या आणि गुण या दोहोंची वाढ होऊ लागली. वरच्या वर्गांना दिलेल्या भेटीत मला ह्या जिल्ह्याच्या किंवा परगण्याच्या प्रमुख ठिकाणी अलिबागेस शाळा काढण्याविषयी आग्रहाची विनंती करण्यात आली. हे ब्राह्मणवस्तीचे शहर असून सभोवतालची खेडीसुद्धा ब्राह्मणांचीच होती.
>
> मला नगरसभेकडून आर्थिक मदत मिळाल्यास नागरिकांच्या विनंतीप्रमाणे मला करता येईल असे आश्वासन मी दिले. योग्य मदत मिळतांच मी पहिले तीन विद्यार्थी घेऊन शाळा उघडली.

आमच्या जवळ वर्षाच्या अखेरीस चाळीस विद्यार्थी झाले, पण अधिक येईनात कारण लोकांना अशी भीती वाटू लागली की, अप्रकटपणे आम्हीं त्यांचे धर्मांतर घडवून आणू. ख्रिस्ती मिशनरी व त्यांचे धर्मप्रसाराचे मार्ग ह्याविषयी लोकात अगदीच अज्ञान होते, किंबहुना मी ख्रिस्ती आहे ह्या गोष्टीवरही त्यांचा विश्वास बसेना.

ह्या सुमारास इंडियन सिव्हिल सर्व्हिसमधले मि. जॉन एल्फिन्स्टन यांची अलिबागचे कलेक्टर म्हणून नेमणूक झाली आणि त्यांनी त्या गावी राहून, तेथे व सभोवारच्या मुलखात, काम करण्यास एक मिशनरी ठेवल्यास मिशनला त्यांनी दरमहा १०० रुपयांची देणगी देण्याचे आश्वासन दिले. त्या क्षेत्रातील काम पूर्वीपासूनच मिशनरी म्हणून स्वतंत्रपणे माझ्या ताब्यात होते व त्यामुळे स्वाभाविकपणे मलाच मिशन कौन्सिलने तेथे जाऊन राहण्यास सांगितले. मि. जॉन एल्फिन्स्टन हे अतिशय सच्छिल व सर्वांशी प्रेमाने व पितृभावाने वागणूक ठेवणारे एक इंग्रज आहेत असे लोकांना दिसून आले होते.

त्यांची सुशील वृत्ति व सत्यप्रियता यांची स्मृती जागृत रहावी म्हणून अलिबागच्या मिशन हायस्कूलला त्यांचे नाव देऊन विभूषित करण्यात आले.

आमच्या शाळेतील भाषाशिक्षणाचा परिणाम आमच्या जिल्ह्यातच नव्हे तर आसपासच्या जिल्ह्यांतसुद्धा पसरला. आमच्या जिल्ह्यातील दुसरे शहर पेण. त्या ठिकाणी आम्ही उत्तम प्रकारे धर्मोपदेशकाच्या कामास सुरवात केली होती. ते ह्या जिल्ह्यातील सर्वांत सधन शहर होते. त्या ठिकाणी ब्राह्मण व प्रभु लोकांची वस्ती होती व ते लोक अतिशय अभिमानी वृत्तीचे असून ख्रिस्ती धर्म व ख्रिस्ती मिशने यांच्या फारच विरुद्ध असत.

अलिबाग हायस्कूलच्या संस्थापकांशी त्यांनी विरोधवृत्ति ठेवली नाही व अलिबागेत असिस्टंट कलेक्टरच्या जागी असलेल्या एका युरोपियन सज्ञनाच्या द्वारे त्यांनी आपल्यासाठी एक इंग्रजी शाळा उघडण्याविषयी बोलणे चालू केले.

पण आम्ही त्या ठिकाणी अगोदर एक मराठी शाळा उघडली. ती तेथील मुसलमान व बेनीइस्राएल यांना उपयोगी वाटली. तेथील हिंदु कारागीर जातीतील मुलांनीसुद्धा आमच्या शाळेचा पुरस्कार केला. त्यांच्यापैकी कासार अथवा ताम्रकार हे अतिशय हुशार व धडाडी दाखविणारे होते व त्या समाजातील प्रमुख लोक आमच्या शाळेत होणाऱ्या धार्मिक विवेचनाच्या वेळी येऊन हजर रहात. तेथील समाजबाह्य चर्मकार जातीसाठीसुद्धा आम्ही एक शाळा उघडली. शिक्षण व धर्मोपदेश या दोन्ही कामी ती अतिशय उपयोगी झाली. शाळेतील मुलांना दिल्या जाणाऱ्या धार्मिक पाठाच्या वेळी त्यांचे आईबाप स्वेच्छेने हजर राहू लागले.

आमचे उपदेशक सोलापूर जिल्ह्यातील ब्राह्मण जातीतून ख्रिस्ती झालेले होते. त्यांनी ख्रिस्ती धर्माचा प्रकटपणे स्वीकार केल्यामुळे त्यांना आपल्या खेड्यात बरीच छळणूक सोसावी लागली होती. ते एक असामान्य साधुवृत्तीचे व आवेशी पुरुष होते आणि त्यांनी आपल्या धीरगंभीर स्वभावाने व सारासारविवेक बुद्धीने तेथील मुसलमान व बेनी एस्राएल लोकांस आपल्याकडे आकर्षून घेतले होते.

## ६
## पेण (१८८१)ः तरुण ख्रिस्तानुयायी हरिपंत केळकर

पेणच्या शाळेसाठी मला अलिबागेस एक चांगले शिक्षक मिळाले आणि त्यांच्या व्यवस्थेखाली शाळेची कार्यक्षमता चांगलीच प्रस्थापित झाली. सरकारी नोकरीची प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण झालेले ते एक तरुण ब्राह्मण होते. ते स्वभावतः विचारशील व अभ्यासू वृत्तीचे होते. ह्या उपदेशकाच्या जवळून ते वाचण्यासाठी पुस्तके मागून घेत व शाळेत जेव्हा ते उपदेशक धार्मिक पाठ देत तेव्हा ते हजर राहत. ह्या तरुण शिक्षकांच्या विचारांची गती अनुकूल होऊन ख्रिस्ती धर्माकडे वळली व तो आलिंगून स्वीकारण्याचा त्यांनी निश्चय केला. ह्या योगाने केवळ त्यांच्या बुद्धीचाच नव्हे पण हृदयाचाही ठाव घेतला होता आणि त्यांचे अध्ययन व त्यांच्या अंतःकरणातील भाव किती असाधारण व उच्चतर होते हे प्रत्ययास आले. त्यांनी कधी प्रतारणा केली नाही. जरी जातपातीवरील त्यांचा विश्वास नष्ट झाला होता तरी अप्रकटपणे जात मोडण्यास ते तयार झाले नाहीत. एकदा एका ब्राह्मण बाईने त्यांना पुरोहित ह्या नात्याने धर्मकार्याच्या प्रसंगी भोजनाचे आमंत्रण दिले. पण अशा भोजनासाठी 'मी योग्य नाही' असे म्हणून त्यांनी नकार दिला. ही योग्यता नष्ट होण्यासारखी एकही गोष्ट त्यांनी बाह्योपरी केली नव्हती पण त्यांचा हिंदुधर्मावरील विश्वास नाहीसा झाला असल्यामुळे मी 'धार्मिकदृष्ट्या अनधिकारी' आहे असे त्यांनी निक्षून सांगितले. मनातून ख्रिस्तानुयायी झालेला ब्राह्मण धर्मकार्याच्या वेळी पुरोहित म्हणून भोजनास जाण्यास योग्य नव्हता. त्या ब्राह्मण बाईला त्यांच्या हरकतीचा अर्थ समजला नाही पण तिने मुकाट्याने मान्यता दर्शविली. अशा रीतीने हा तरुण मनुष्य भोजन आणि दक्षिणा ह्या दोहोंनाही मुकला. त्यांच्या मनाचा पूर्णपणे निर्धार झाल्यावर त्यांनी अलिबागेस जाऊन आपल्या आईची व आप्तेष्टांची भेट घेतली व जेव्हा त्यांना दिसून आले की, ह्यांना ख्रिस्ती मंडळीत प्रविष्ट होण्यापासून परावृत्त करणे शक्य नाही तेव्हा त्यांनी त्यांच्या अंगावरचे कपडे ओढून काढून त्यांना घराबाहेर घालवून दिले. नंतर ते पेणेस परत गेले व आपले बिऱ्हाड बदलून ते त्या उपदेशकाच्या घरी राहण्यास गेले आणि त्यांनी उघडपणे आपली जात मोडली.

एका नाताळाच्या दिवशी आम्ही त्यांचा बाप्तिस्मा केला. गावातले लोक मोठ्या संख्येने हजर होते आणि समोरच्या उघड्या पडवीत ज्यांना बसण्यास जागा राहिली नाही ते रस्त्यावर उभे राहिले आणि संभावितपणे व शांतपणे त्यांनी रस्त्यावरून बाप्तिस्म्याची उपासना पाहिली. उपासना अगदी गांभीर्यपूर्ण होती आणि मोठ्या संख्येने उपस्थित असलेले श्रोते आदराने व एकाग्रतेने श्रवण करीत होते, सविस्तर प्रवचन कुतूहलपूर्वक ऐकत होते आणि बाप्तिस्म्याच्या विधीची परिणामकारकता दृष्टीस पडत होती. तो विधी इतका साधा होता ह्याचेच लोकांना नवल वाटले. जडोच्चारात प्रार्थनांचे पठण झाले नाही, जात मोडण्यासाठी काही सेवन करण्यास दिले नाही आणि दुसऱ्या धर्मांची अगर लोकांची कोणत्याही प्रकारे निंदा करण्यात आली नाही. त्यावेळी लोकांनी जे काही अवलोकन केले त्यावरून ख्रिस्ती धर्माची आध्यामिकताच त्यांच्या मनावर बिंबली गेली.

ते तरुण ख्रिस्तानुयायी हरिपंत केळकर.

२५ डिसेंबर १८८१ रोजी डी. मखीकन यांच्या हस्ते पेणेस हरिपंतांचा बाप्तिस्मा झाला. त्यांच्या बाप्तिस्म्यासाठी डॉ. मकीखन मुंबईहून पेणेस गेले असल्यामुळे त्यांनी मुंबईच्या आम्रोली उपासनामंदिराच्या त्यावेळच्या नोंदणीपुस्तकात हरिपंतांच्या बाप्तिस्म्याची नोंद केलेली आहे. हरिपंतांचे जन्म साल १८६१ व त्यांच्या वडिलांचे पूर्ण नाव गोविंद हरि केळकर एवढीच माहिती त्यात नमूद केलेली आहे. पेणेस हरिपंतांचा

बाप्तिस्मा झाला त्या वेळी ते एक मराठी शिक्षक होते. त्या वेळी त्यांनी ज्ञानोदयाच्या ६ जानेवारी १८८२ च्या अंकात आपल्या बाप्तिस्म्याची हकीगत प्रसिद्ध केली होती. 'मीं बाप्तिस्म्याचे द्वारें प्रभु येशू ख्रिस्तास सर्वांसमक्ष अंगिकारलें' ह्या लेखात त्यांनी स्वतःविषयी दिलेली हकीगत एवढीच आहे की, 'मी अल्लीबाग एथें आपल्या मामाच्या घरीं राहून तेथील सरकारी शाळेंत मराठी सहाव्या यत्तेचा अभ्यास केला.' मराठी सहावीची परीक्षा त्या वेळी मराठी अभ्यासक्रमातली शेवटची परीक्षा व सरकारी नोकरीची पहिली प्रवेशपरीक्षा होती. सहाव्या इयत्तेच्या परीक्षेला बसण्यासाठी वयाची सतरा वर्षे पुरी व्हावी लागत. ह्या परीक्षेला पुढे व्हर्नाक्युलर फायनल हे नाव मिळाले व वयाची मर्यादा राहिली नाही.

गणपतराव नवलकरांच्या भेटीचा योग, रामभाऊ केसकरांच्या परिचयाचा लाभ, बाबा पदमनजींचे ग्रंथ, व शाहु दाजी कुकडे ह्यांचे ज्ञानोदयातील लेख ह्या सर्वांमुळे हरिपंत केळकर ख्रिस्ती धर्माकडे आकर्षित होत गेले होते. हा ऋणानुबंध ते विसरले नाहीत ह्याची साक्ष 'बरें करतांना थकूं नये' (१८८८) व 'रामचंद्र बाळाजी केसकर यांच्या परिचयाचा लाभ' (१८९२) हे त्यांचे दोन लेख देतात.

## ७
## हरिपंतांच्या आयुष्यातील १८८२ ते १८८८ चा काळ

हरिपंतांचा, त्यांच्या बाप्तिस्म्यानंतरचा, १८८२ ते १८८८ हा सात वर्षांचा काळ अलिबागेत गेला. तेथें जॉन एलफिन्स्टन हाय स्कूल निघाल्यामुळें इंग्रजी शिक्षणाच्या सोयीचा त्यांनी फायदा करून घेतला. शिक्षण देणे व शिक्षण घेणे हा त्यांचा व्यवसाय मॅट्रिक होईपर्यंत चालू राहिला. अर्थात धर्मोपदेश व गद्यपद्य लेखन हेही चालूच होते. १८८८ साली नोव्हेंबर महिन्यात ते मॅट्रिक्युलेशन परीक्षा पास झाले.

ह्या काळात त्यांनी कविताबद्ध केलेले 'दाविदाचें पहिलें गीत' (१८८३), 'हो प्रसन्न मंदक्रोध..' (१८८३), 'प्रभुजी वंदन तव चरणी' (१८८४) ही गीते व काही स्फुट कविता व 'खऱ्या एकेश्वर मताचा वास्तविक उद्गम हिंदु धर्म आहे कीं ख्रिस्ती धर्म?' (१८८५), 'महदन्तर' (१८८६), 'हा खरोखर देवाचा पुत्र होता' (१८८७), 'नवीन श्राद्धपद्धति' (१८८८) व 'बरें करतांना थकूं नये' (१८८८) हे लेख ज्ञानोदयातून प्रसिद्ध केले. या गद्यपद्य लेखनात त्यांची ख्रिस्तचरणी जडलेली आसक्ती व त्यांची नवीन आध्यात्मिक वृत्ती दिसून येते.

'खऱ्या एकेश्वर मताचा वास्तविक उद्गम हिंदु धर्म आहे कीं ख्रिस्ती धर्म?' हा वैचारिक वादविवाद ज्ञानोदय व सुबोधपत्रिका ह्या पत्रांतून त्या वेळी चालू होता. त्या वादाचे आद्यप्रवर्तक रेव्ह. निळकंठशास्त्री गोरे एक नामांकित विद्वान होते व महाराष्ट्रीय विद्वज्जनांत त्यांना मानाचे स्थान असे. तर्कशुद्ध विवेचनावर निळकंठशास्त्र्यांचा भर असून त्यांचे विषयप्रतिपादन बौद्धिक प्रवृत्तीचे असे. प्रार्थना समाजाचे एकेश्वरी मत ख्रिस्ती धर्मज्ञानावर प्रस्थापित झाले आहे हे प्रार्थना समाजी बंधूंना पटवून देण्याकरता शास्त्रीबुवांनी हा वाद उपस्थित केला होता. त्यांनी केवळ बुद्धिवादावर दिलेला भर ओळखून की काय हरिपंतांनी त्याच विषयावरील आपला लेख ज्ञानोदयातून प्रसिद्ध केला. ख्रिस्ती आध्यात्मयोगात ईश्वरी अनुग्रहाचे अधिष्ठान आहे - मानवी बुद्धीचे नव्हे - हे ह्या लेखात दाखवून दिले आहे.

मानवी मनाची शक्ती आणि ईश्वरी अनुग्रह ह्यांचा अनुपमयोग म्हणजेच ख्रिस्ती आध्यात्मयोग. असा आध्यात्मयोग जीवनात परिवर्तन घडविणारा होतो. परिवर्तन ह्या अर्थगर्भित शब्दात ईश्वरी अनुग्रहाने होणारा नवशक्तीचा लाभ हा अर्थ समावलेला असला तरी परिवर्तनाचा तेवढाच अर्थ नसून नवशक्तीने व नवदृष्टीने नवजीवनात प्रवेश करणे म्हणजे परिवर्तन होय, हे दाखवणारा 'महदन्तर' हा पुढचा लेख आहे. बॉम्बे गार्डियन पत्रात निनावी प्रसिद्ध झालेल्या एका लेखाला अनुलक्षून हा लेख ज्ञानोदयातून प्रसिद्ध केला होता. त्या निनावी लेखकाचे एलि लक्ष्मण लोखंडे जालनेकर ह्या नवशिष्याच्या परिवर्तित जीवनाविषयी लिहिताना त्याच्या वर्तनाला शिशुतुल्य वर्तन म्हटले होते. शिशुतुल्य वर्तन म्हणजे बालिश वर्तन नसून उच्चतम आध्यात्मिक जीवन होय हे 'महदन्तर' ह्या लेखात स्पष्ट करून दाखविले आहे.

देवत्वाचे खरे प्रकटीकरण जो ख्रिस्त त्याच्या देवत्वाविषयी ख्रिस्ती धर्मशास्त्रात आढळणारे पुरावे 'हा खरोखर देवाचा पुत्र होता' या लेखात सांगोपांग विवेचन करून ख्रिस्ती व ख्रिस्तीतर वाचकांपुढे मांडले आहे. देव अवतार घेत नाही या तत्वाचे पुरस्कर्ते प्रार्थनासमाजपंथी यांनाही उद्देशून हा लेख लिहिलेला आहे. त्याचप्रमाणे त्याच्या पुढचा 'नवीन श्राद्धपद्धति' हाही लेख त्यांना उद्देशून लिहिलेला आहे. मनुष्याच्या मरणोत्तर अवस्थेविषयी प्रार्थनासमाजी बंधूंच्या मनांत उद्भवणारी साशंक वृत्ती या लेखात दाखवून दिली असून मरणोत्तर अवस्थेविषयी अभय बाळगणाऱ्या ख्रिस्ती जनतेपुढेही त्यात महत्वाचे विचार मांडले आहेत.

अशा विचार-प्रभावलीत हरिपंतांचा १८८२ ते १८८८ हा सात वर्षांचा काळ, ईश्वरी अनुग्रहाने, पुढच्या सेवेला लागणाऱ्या आध्यात्मिक तयारीत गेला असे म्हणावे लागेल.

## ८
## हरिपंतांच्या आयुष्यातील १८८९ ते १८९५ चा काळ

शालेय शिक्षणक्रम पुरा करून हरिपंत अलिबागेहून मुंबईस आले. १८८९ साल त्यांनी विल्सन कॉलेजात घालवले. त्या वेळी हल्लीप्रमाणे वार्षिक अभ्यासक्रमाची सुरुवात जूनपासून होत नसे. पहिली सहामाही सुटी मे महिन्यात व पुढची ऑक्टोबर महिन्यात होत असे. पहिल्या सुटीत ते महाबळेश्वरास जाऊन राहिले होते. 'महाबळेश्वर येथें पाहण्यात येणाऱ्या कित्येक गोष्टी' (१८८९) हा त्यांचा वर्णनपर लेख त्यांच्या रसिक पण देवभिरू मनाची साक्ष देणारा आहे. डोंगर, खोरी, निरनिराळी झाडे, डोंगरांस लागून जाणारी धुकी, अंगास लागणारा मंद मंद शीतल वायू, त्यावर आरूढ होऊन येणारे पुष्पगंध, ही सारी वासंतिक रम्यता अवलोकून व अनुभवून त्यांच्या मनात जगन्नियंत्या ईश्वराविषयीं कृतज्ञतेचे भाव जागृत होत.

महाबळेश्वरास राहत असताना हरिपंतांना प्रतापगड व सावित्रीला उगम देणारा खोरा ह्यांचे दर्शन घडले होते. पण प्रतापगडाच्या खाली सावित्रीच्या परिसरात वसलेले पोलादपूर गाव व तेथे असलेली कबर त्यांच्या कल्पनेतही नसेल. पण पुढच्याच सुटीत तो योग जुळून येणार होता.

२६ ऑक्टोबर १८८९ रोजी डॉ. मकीखन व हरिपंत केळकर पोलादपुरास गेले व हरिपंतांनी ही कबर पाहिली. ही हकीकत 'कोंकणांतील उपदेशाच्या फेरीचा वृत्तांत' ह्या लेखात आली आहे. पोलादपूर व तेथे असलेली डॉनल्ड मिचेल ह्यांची कबर पाहून हरिपंतांच्या मानत सेवेचे विचार जागृत झाले आणि 'निदान या ठिकाणीं तरी आमच्या मिशनानें एक उपदेशक ठेवावा अशी माझी त्यांस विनंति आहे' असे मनोगत त्यांनी

व्यक्त केले. फ्री चर्च मिशनाने त्यांच्या विनंतीचा विचार केला व ईश्वरी सूत्राने त्यांनाच त्या सेवेचे पाचारण मिळाले. १३ फेब्रुवारी १८९० रोजी हरिपंतांनी पोलादपुरास आपल्या सेवेची सुरवात केली.

कॉलेज शिक्षणाचे निमित्त-मात्र कारण होऊन हरिपंत मुंबईस आले व डॉ. मकीखन ह्यांच्याशी त्यांचा निकट संबंध जडला. तेव्हापासूनच धर्मोपदेशाच्या कामी ते त्यांच्या उपयोगी पडू लागले. परिणामी कॉलेजचे शिक्षण त्यांनी सोडून दिले व धर्मोपदेशक बनून ते गावोगाव फिरले. हा त्यांचा ख्रिस्ती जीवनातील दुसरा सात वर्षांचा काळ.

'कोंकणांतील उपदेशाच्या फेरीचा वृत्तांत' (१८८९), 'पोलादपूर येथें फ्री चर्च मिशनच्या कामाचा आरंभ' (१८९०), 'ठाणें जिल्ह्यांतील शुभवर्तमान प्रसाराचें काम' (१८९२), 'कर्जतवर्णन' (१८९३), 'न्यायांत पक्षपात करणें बरें नाहीं' (१८९४) इत्यादी लेख त्यांनी गावोगावी केलेल्या उपदेशाच्या कामाचे दर्शक आहेत.

पोलादपूरच्या कामाविषयी लिहिताना त्यांनी म्हटले आहे की, 'हें काम जरी फ्री चर्च मिशनानें सुरुं केलें आहे व जरी तें मजकडून सुरुं झालें आहे तरी तें काम फ्री चर्च मिशनाचें किंवा माझें नसून ज्यांना ख्रिस्ताच्या आज्ञा प्रमाण, अशा एकंदर ख्रिस्ती मंडळीचें तें आहे.' कर्जतच्या कामाविषयी त्यांनी अशाच प्रकारचे उद्गार काढले आहेत. हे त्यांचे विचार मननीय वाटतात.

'ह्या काळात हरिपंतांनी पुष्कळ गद्यपद्य लेखन केले. त्यापैकी 'सुबोधपत्रिकेच्या एका आरोपास उत्तर' (१८८९) हा लेख, 'सद्भक्त' (१८९०) ही कविता, 'ठाण्याच्या विहिरींत गंगा आली' (१८९२), 'आत्मिक कृपादानें' (१८९४), 'क्षत्रियांचीं कुलें' (१८९५) व 'संवाद' (१८९५) इतक्यांचा समावेश आहे.

१८९५ पर्यंतच्या काळात हरिपंतांनी पुष्कळ लहान मोठी पुस्तके लिहिली. त्या वेळी बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटीच्या प्रकाशनांची यादी ज्ञानोदयात प्रसिद्ध होत असे. त्यात 'प्रभावलि' (पद्यात्मक), 'दुखणाईतांसाठीं समाधानाचीं वचनें' (भाषांतर) आणि 'प्रेमभाव' (भाषांतर) ह्या पुस्तकांचा उल्लेख आढळतो. बाबा पदमनजींच्या स्मृतिलेखात हरिपंतांनी लिहिलेल्या अकरा भक्तिगीतांचा आणि 'त्रिवेणी' व 'प्रभावलि' ह्या पुस्कांचा उल्लेख केला आहे. ही पुस्तके ट्रॅक्ट सोसायटीने प्रसिद्ध केली होती असे त्यांनी म्हटले आहे. ट्रॅक्ट सोसायटीने प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांपैकी 'धर्मतुला' हे हरिपंतांनी भाषांतर करून तयार केलेले एकच पुस्तक सध्या उपलब्ध आहे. त्यांच्या 'त्रिवेणी' (१८९०) व 'प्रभावलि' (१८९२) ह्या दोन पुस्तकांचा उल्लेख गोविंद चिमणाजी भाटे ह्यांनी आपल्या 'आर्वाचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास १८०० ते १९३८' ह्या पुस्तकात केला आहे.'त्रिवेणी' ही सामाजिक कादंबरी आहे व 'प्रभावलि' ही पद्यमाला असून तिच्यात ख्रिस्ताचा पर्वतावरील उपदेश उत्तम पद्यरूपात कथन केला आहे. अशा आशयाचे उद्‌गार भाटे ह्यांनी आपल्या ग्रंथात काढले आहेत. 'त्रिवेणी' व 'प्रभावलि' ही दोन्ही पुस्तके सध्या तरी दुर्लभ झाली आहेत.

श्री. शंकर गणेश दाते ह्यांनी आपल्या मराठी ग्रंथसूचि नामक १९४३ साली प्रसिद्ध केलेल्या ग्रंथात हरिपंतांच्या 'धर्मतुला' ह्या पुस्तकाचा उल्लेख तुलनात्मक धर्म ह्या सदराखाली केला आहे. 'धर्मतुला' ह्या पुस्तकात हरिपंतांनी स्वरचित स्फुट कवितेचा जागोजागी उपयोग केला आहे व शेवटी 'दिव्य त्राता सत्य गुरु येशू हा खरा' हे पद घातले आहे. हे पुस्तक १८९४ च्या सुमारास प्रथमतः प्रसिद्ध झाले असावे असे अंतर्गत पुराव्यावरून म्हणता येईल.

सेन्ट फ्रॅन्सिस झेवियर ह्या विख्यात विभूतीच्या शव-दर्शनाचा सोहळा दर दहा वर्षांनी गोव्यास होत असे. १८९० साली असा दशवार्षिक सोहळा होणार होता. तो ३ डिसेंबर १८९० पासून १ जानेवारी १८९१ पर्यंत झाला असा ग्रंथाधार आहे. पोलादपूरसारख्या ठिकाणी रहात असतानासुद्धा हरिपंतांनी जिज्ञासूवृत्तीने ही संधी साधून गोव्यास जाण्याचे ठरवले. अलिबागचे उपदेशक जॉन बरेटो व शिक्षक जॉन वासुदेव धुपकर हेही जाणार होते. गोव्याची सफर करण्याकरिता ही त्रयी मुंबईस आली. त्या वेळी अमेरिकन मिशनच्या शाळेत शिकत असलेले धुपकरांचे धाकटे बंधू बेंजामिन धुपकर हे त्यांना प्रथमतः भेटले. जॉन बरेटो ह्यांनी प्रवासासाठी घेतलेल्या शिधासामग्रीत मांसान्नाचा समावेश केला होता. हरिपंत नव्यानेच ख्रिस्ती झाले होते ही गोष्ट मनात येऊन त्यांना ही शिधासामग्री कितपत मानवेल असे बेंजामिन धुपकर ह्यांना त्या वेळी वाटले. पुढे पाच सहा वर्षांनी त्यांचा निकटचा संबंध जुळून आला, तेव्हा हरिपंतांची रुची बदलली नसली तरी पूर्वीचे विधिनिषेध त्यांच्या मनात राहिले नव्हते हे बेंजामिन धुपकरांना कळून आले. अलिबागच्या शाळेत बेंजामिन धुपकर विद्यार्थी म्हणून गेल्यामुळे हा निकट संबंध जुळून आला होता. पुढे वैद्यकीय अभ्यास पुरा करून डाँ बेंजामिन आपल्या व्यवसायात पडले तरी हा स्नेहसंबंध शेवटपर्यंत राहिला. पोरबंदर संस्थानाच्या सेवेतून निवृत्त होऊन आता तेथेच कालक्रमण करीत असलेले डॉ. बेंजामिन ह्यांनी ही माहिती पत्रद्वारे कळविली आहे.

काही कारणांमुळे पोलादपूरचे काम बंद करण्याचे ठरवून फ्री चर्च मिशनने १८९१ च्या ऑक्टोबर महिन्यात ते बंद करण्याचा निर्णय घेतला. त्या वेळी रोहे व महाड ह्या दोन ठिकाणी अमेरिकन मिशनचे काम चालू होते व फ्री चर्च मिशनच्या सूचनेवरून अमेरिकन मिशनने पोलादपूरचे काम आपल्या हातीं घेतले. अर्थात् फ्री चर्च मिशनने हरिपंतांची तेथून बदली करून ठाण्यास त्यांची तात्पुरती नेमणूक केली. पुढे कर्जत मुक्कामी राहून तेथेच त्यांनी नवीन कामास सुरुवात करावी असे ठरले व मार्च १८९३ पासून ते कर्जतास जाऊन राहिले.

मुंबई व पुणे ह्या दोन ठिकाणी फ्री चर्च मिशनचे काम चालू असल्यामुळे मुंबई-पुणे मार्गावर ठिकठिकाणी आपली ठाणी असावीत असा त्या मिशनचा उद्देश होता. ठाणे व कर्जत ह्या दोन ठिकाणी काम सुरू झाल्यावर कर्जत व पुणे यांमधील मावळ प्रांतात काम सुरू करण्यास योग्य ठिकाण ठरविण्याची खटपट सुरू झाली. ह्या वेळी हरिपंत मावळात गेले होते, व ते ह्याच कामी गेले असावेत असे वाटते. पावसाळ्याच्या दिवसांत कर्जत मुक्कामी राहून आसपासच्या खेड्यांत उपदेशाच्या फेरीवर जाणे शक्य होत नसल्यामुळे १८९४ साली पावसाळी चार महिने हरिपंतांनी पुण्यास राहून रेव्ह. जॉन टॉरेन्स यांच्या निर्देशानुसार काम करावे असे मिशन कौन्सिलने ठरवले.

मध्यंतरी १८९३ साली रेव्ह. गणपतराव नवलकर अलिबागेहून सेवानिवृत्त झाले होते. त्यांच्या जागी काम करण्यास फ्री चर्च मिशनमध्ये कोणी नसल्यामुळे अमेरिकन मराठी मिशनच्या सहकार्याने ज्ञानोदयाचे तत्कालीन संपादक आनंदराव सांगळे यांची अलिबागच्या कामावर नेमणूक झाली होती. आनंदराव सांगळ्यांनी १८९४ च्या मे अखेरीस अलिबागच्या कामाचा राजीनामा दिला व त्यामुळे तेथील कामाची तात्पुरती व्यवस्था मिशन कौन्सिलला करावी लागली. त्या वर्षी जुलै महिन्यांत मिशन कौन्सिलने असा ठराव केला की, हरिपंतांनी अलिबागेस जाऊन राहावे व तेथे राहून अलिबागच्या हायस्कूलमध्ये धर्मशिक्षणाची व्यवस्था आणि अलिबागेस व बाहेरगावी मिशनने उघडलेल्या मराठी शाळांची देखरेख आपल्या हातीं घ्यावी. ही माहिती फ्री चर्च मिशनच्या वेस्टर्न इंडिया मिशन कौन्सिलच्या टिपणांतून मिळवलेली आहे.

## पोलादपूर (१८९४): हरिपंतांपुढे एक आव्हान

दोघा अज्ञात व्यक्तींनी पोलादपूरच्या कामाविषयी १८९४ मध्ये लिहिलेले जे दोन लेख ज्ञानोदयात मिळाले, ते खाली दिले आहेत. लेखिका 'काठी' बाई व लेखक 'बी. बी.' ह्यांच्याविषयी माहिती मिळवणे शक्य झाले नाही.

बहुत दिवसांपासून अमेरिकन मिशनसंबंधानें चाललेल्या पोलादपूर येथील कामासंबंधानें दोन शब्द लिहिण्याचें योजीत होते. पण आज संधि सांपडल्यामुळें हें आपणांकडे पाठवितें.

पोलादपूर हें महाडापासून सुमारें दहा मैलांवर वसलेलें एक गांव आहे. औरंगजेब बादशहानें शिवाजीशीं लढाई करण्याकरतां पाठविलेला पोलादजंग नामक सरदार एथें बरेच दिवस उतरला होता, त्यावरून या गांवाचें नांव पोलादपूर पडलें असें म्हणतात. पूर्वी हें गांव प्रसिद्ध होतें, पेशवाईंत महाल होता, व पार घाट बंद होण्यापूर्वीं येथें लाखों रुपयांची घडामोड सतत चालू असे. यांमुळें पुष्कळ गुजर व्यापारी व सावकार यांची वसाहत झाली. गांवाची पूर्वीं मोठी भरभराटी होती याची येथें अद्याप हयात असलेले २०-२५ हजारांचे वाडे साक्ष देतात.

प्रथम फ्री चर्च मिशनानें येथें काम आरंभिलें. महाडासारखें मोठें शहर सोडून या एकीकडे वसलेल्या खेड्यांत त्यांनीं काम सुरू करण्याचें विशेष कारण हें होतें कीं, त्यांच्या संबंधांतील एका मिशनेरी वीराची येथें कबर आहे. हे मिशनेरीसाहेब पूर्वीं एका इंग्रजी रेजिमेंटचे कर्नल होते. पण शुभवर्तमानाची घोषणा करण्याच्या उत्कट इच्छेमुळें आपलें, काम, लौकिक, मानमान्यता व मोठा पगार हीं सर्व यांनीं राजीखुषीनें झुगारून देऊन बाणकोट मुक्कामीं ठाणें घातलें. शाबास या ख्रिस्ती वीराची! आम्हां हिंदुस्थानवासी लोकांकरितां पदराला झीज लावून किंबहुना जीव धोक्यांत घालून झटणारे मिशनेरी हेच साहेब नसून पुष्कळ होऊन गेले व अद्याप आहेत, असें असून आम्हीं या मिशनेरींचे आभार मानावे तितके थोडे. हे साहेब आजारी झाल्यामुळें साताऱ्यास हवा बदलण्यास चालले होते. तेव्हां वाटेंतच त्यांचा अंतःकाळ झाला. या ख्रिस्ती वीराच्या स्मरणार्थ फ्री चर्च मिशननें येथें ठाणें घातलें होतें. यावरून आम्हां सर्वांस आनंद वाटत होता.

हरिपंत केळकर येथें रहात असत, व त्यांचें कामहि उत्तम चाललें होतें. पण ईश्वरी सूत्र वेगळें होतें. म्हणून लवकरच त्यांची येथून बदली झाली व दुसरा कोणी फ्री चर्चतर्फे येथें यावयास खुषी नसल्यामुळें हें ठाणें त्यांनीं अमेरिकन मिशनच्या स्वाधीन केलें.

फ्री चर्च मिशनानें घातलेल्या पायावरतीच अमेरिकन मिशन बांधीत आहे. महार-चांभारांसाठीं त्यांनीं स्थापलेली शाळा अद्याप चालू आहे. उपदेशाचें काम मोठ्या जारीनें चाललें आहे, व तें काम निरर्थक झालें नाहीं. कारण या दोन तीन वर्षांत चारपांच जण उपदेशाच्या कामामुळें देवाकडे फिरले आहेत. आणखी १२ जण बाप्तिस्मा घेण्यास तयार आहेत. पण त्यांचें चांगलेंसें शिक्षण होईपर्यंत तो संस्कार त्यांस देण्याचें तहकूब ठेवणें बरें दिसतें. पुढें मागें हे गरीब व अज्ञानी जरी आहेत तरी प्रभूचे मुकुटमणी होतील अशी आशा आहे. शाळेच्या कामामुळें प्रभूकडे अद्याप कोणी वळला नाहीं हें खरें, तरी धैर्य खचवून उपयोग नाहीं. या शाळेच्या संबंधानें कांहीं सुचिन्हें दृष्टीस पडतात, व ईश्वर करील तर तिच्या योगें या पोलादपूर मुक्कामीं

त्याचें मोठें गौरव होईल. श्रम करणें हें आमचें काम आहे, फळ देण्याचें त्यानें आपल्या स्वाधीन ठेवलें आहे. - *'काठीबाई', ज्ञानोदय साप्ताहिक, १४ जून १८९४*

पोलादपूर येथील…रक्तपिती लोकांमध्यें चाललेल्या कामासंबंधानें दोन शब्द लिहितों.

१८९२ च्या एप्रिल महिन्यांत पोलादपूर येथील अमेरिकन मिशनच्या कामास आरंभ झाला. ज्या उपदेशकास येथें पाठविलें होतें, तो शाळेचें काम पाहून उपदेशहि दररोज दोन वेळां करी. गरीबगुरीबांस उपदेश करण्याची व साहाय्य करण्याची त्यास विशेष आस्था असल्यामुळें तो पांढरपेशांमध्यें न जातां महार, चांभारवाड्यांमध्येंच विशेषेंकरून जाई. त्यानें हें आपलें काम मोठ्या आस्थेनें चालविलें होतें, हें पोलादपूरकर व आसपासच्या गांवांतील यांच्या सांगण्यावरून कबूल करावें लागतें. हा भाऊ सध्यां आमच्यामध्यें नाहीं. तरी जेथें तो असेल तेथें परमेश्वराचा आशीर्वाद भरपूर मिळवून ख्रिस्तभक्तींत तल्लीन झालेला असा ख्रिस्तसेवेंतील एक शूर शिपाई तो व्हावा, अशी आमची मनापासून प्रार्थना आहे. गरीबगुरीबांमध्यें चाललेला त्याच्या कामाचा परिणाम एका रक्तपिती बाईचें ख्रिस्ताकडे वळणें हा होय. तिला त्यानें बरेच दिवस ख्रिस्ती धर्माविषयीं शिकविलें व ती तयार झाली आहे असें समजून तीस बाप्तिस्मा द्यावा असें रोहें येथील मंडळींतल्या एका दीक्षित भावास त्यानें सांगितलें. पण त्या भावास तिच्या उद्देशाविषयीं संशय वाटल्यावरून तिला बाप्तिस्मा देण्याचें रहित झालें. या बाईस लिहितां वाचतां मुळींच येत नाहीं, तशांत ती मूळची अतिशूद्र असून दुसऱ्या अशिक्षित लोकांपेक्षां तिचें अज्ञान मोठें, असें निदान लोकांचें म्हणणें आहे. असें असून ख्रिस्ताच्या मंडळीच्या बाहेर ती सहा महिने टिकून राहिली, ही नवलाची गोष्ट नव्हे काय?

बिचाऱ्या या व्याधिष्ट लोकांची कोंकणांत फार हाल-अपेष्टा असते. गरिबांतील किंवा श्रीमंतांतील, उंच जातींतील किंवा नीच जातींतील, जर्जर झालेल्या म्हाताऱ्या म्हातारीपासून ते लहानशा मुलामुलीपर्यंत, कोणालाहि रक्तपिती लागल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं कीं, त्यांस आपलें घरदार, बायको, लेकरें, इष्टमित्र, गणगोत सर्व सोडून गांवाच्या बाहेर बरेंच लांब एखाद्या लहानशा झोपडीमध्यें रहावें लागतें. ज्यास त्याचे नातलग रोज अन्नपाणी आणून देत असतील असा भाग्यवंत रक्तपिती विरळाच कोंकणांत सांपडावयाचा. बाकीच्यांस भीक मागून आपला निर्वाह चालवावा लागतो.

या रीतीला अनुसरून या बाईलादेखील तिच्या नवऱ्यानें टाकून दिलें. यामुळें ती आपला निर्वाह भीक मागून करी, व तिचें वास्तव्यस्थान गांवाच्याबाहेर अर्ध्या मैलावर असलेल्या एका झाडाखालची सांवली हीच असे. आपल्या निर्वाहाची सोय होईल असें वाटून जर हिनें बाप्तिस्मा मागितला असता, तर तिचा तो संस्कार करण्याचें नाकारिलें हें पाहून तिनें पूर्वीप्रमाणें एका हिंदु बाईप्रमाणें वहिवाट ठेवली असती. पण एव्हांपासून तिच्या वर्तनक्रमामध्यें अगदींच बदल झाला, कारण तिला जरी बाप्तिस्मा मिळाला नव्हता तरी ती अगदीं ख्रिस्ती बाईप्रमाणें वागूं लागली. रोहें येथील मंडळीनें ज्या झाडाखालीं ती राहत होती तेथेंच चार पांच रुपये किंमतीचें एक लहानसें झोपडें तिला बांधून दिलें होतें. या झोपड्याच्या गांवकऱ्यांनीं आज वांता ओढ, उद्यां पेंढा उडवून टाक अशा प्रकारें करून कालगतीनें विध्वंस केला व भर पावसांत तिला निराश्रित अशी करून टाकली. गांवांत ती भीक मागावयास जाई तेव्हां लोक तिला हजारों शिव्या देत, भीक घालीत ना, व बहुत प्रकारें तिचा छळ करीत. ही बाई अज्ञान असून पुष्कळ चुक्या करितें, तरी ती इतकी ख्रिस्तभक्तिपरायण आहे कीं कोणत्याहि कारणास्तव ती ख्रिस्ताला नाकारीत नाहीं. असें असून तिला ख्रिस्ताच्या मंडळींत घेण्यासंबंधानें कोण विरोध करील? तिचा बाप्तिस्मा झाल्यावर लवकरच एक दुसरी बाई आली. या बाईसहि

ख्रिस्ताच्या नांवासाठीं पुष्कळ संकटें सहन करावीं लागलीं. पोलादपुरास कोणी तिला भिक्षा घालीना, सबब एके वेळेस दोन दिवस उपास काढून व्याकुळ झाल्यामुळें ती दूरच्या एका गांवास भीक मागावयास निघाली. तिला दुरून येतांना पाहून एक मनुष्य हातांत मोठा थोरला सोटा घेऊन धांवत तिच्याजवळ आला - बिचाऱ्या बाईनें आपल्या घराची वाट धरली.

बिचाऱ्या गंगाबाईस पुष्कळ संकटें सोसावीं लागलीं व शेवटीं तिच्या पायांवरती एका मुलानें मोठासा दगड मारला व त्यामुळें तिला मोठी जखम झाली. ती जखम कधींच बरी झाली नाहीं. शेवटीं गेल्या वर्षाच्या डिसेंबर महिन्यांत तिला देवाज्ञा झाली. धन्य या गरीब पण 'ख्रिस्तामध्यें धनवान्' अशा बाईची. ख्रिस्तासाठीं जीव देणारे आमच्या हिंदुस्थानांत देखील नाहींत असें नाहीं. - *'बी. बी.', ज्ञानोदय साप्ताहिक, ५ जुलै १९०४*

## १०
## पोलादपूर (१८९५)ः महारोगपीडितांच्या रुग्णालयाचा पाया

हरिपंतांना अलिबागेहून पोलादपुरास जाण्यास व तेथील काम हाती घेण्यास कोणती योजना कारणीभूत झाली, हे शोधून काढणे आता अशक्यप्राय झाले आहे. हरिपंतांनी स्वतः त्या घटनेविषयी कुठेच उच्चार केला नाहीं.

कुलाबा जिल्ह्यातील मिशन क्षेत्रात काम करण्यास आलेले स्कॉटिश मिशनरी रे. डब्ल्यू. ई. विल्की ब्राऊन नुकतेच आले असून पूर्वतयारीसाठी पुण्यात रहात होते. डॉ. मकीखन ह्यांनी त्यांना पोलादपूर व तेथे काम करीत असलेले हरिपंत केळकर ह्यांच्याविषयी माहिती सांगून बाणकोटच्या खाडीतून कुलाबा जिल्ह्यातील पहिला प्रवास करण्याचे सुचवले.

रे. विल्की ब्राऊन ह्यांनी १९५४ साली डॉ. डंकन फ्रेझर ह्यांना पाठवलेल्या पत्रात आपल्या पोलादपूर भेटीचे वर्णन असे केले आहेः

पोलादपूरची माझी पहिली आठवण मार्च १८९५ मधली. मी महाबळेश्वरास जाण्याकरता समुद्रकिनाऱ्याच्या आगबोटीने बाणकोटपर्यंत, पुढे लहान बोटीने सावित्री नदीतून वर व पुढे रस्त्याने महाबळेश्वरपर्यंत प्रवास केला. माझे मित्र डॉक्टर मखीकन यांनी मला सांगून ठेविले होते की, 'डॉनल्ड मिचेलची कबर दिसेल ती पहा आणि तेथेच हरिपंत केळकर आपण स्वतः संघटित केलेल्या महारोग्यांच्या वसाहतीत बापाप्रमाणें त्यांची काळजी घेत असलेले आढळतील. मी त्या ठिकाणी एक दिवसभर राहिलो. त्यावेळी मी ती कबर पाहिली. आणि माझी आशा आहे की, ज्याने धर्मोपदेशक होण्यासाठी आपल्या लष्करी नोकरीचा त्याग केला त्याची ती कबर व त्याच्यासंबंधी तिच्यावर असलेला चित्तवेधक शिलालेख ही तेव्हाप्रमाणें अजूनही सुरक्षित असतील.'

माडाच्या झापांच्या थोड्याशा झोपड्यांत राहात असलेल्या महारोग्यांची वसाहत मी पाहिली. त्या ठिकाणी हरिपंत केळकर त्यांच्याकरिता सर्वच काही करीत होते. त्यांच्या अन्नासाठी ते स्वतः तेथील वाणी

लोकांजवळून भिक्षा मागून आणीत व हे लाचार लोक आपल्या दुकानांजवळ फिरकत नाहीत म्हणून त्यांनाही ते बरेच वाटे.

तोच पोलादपूरच्या रुग्णालयाचा पाया.

त्यावेळी रेवदंड्याच्या वरच्या बाजूला, रोह्याला अमेरिकन मिशनचे मुख्य ठाणे होते. त्यांच्या सहकार्याने लेपर मिशनाने हे एक व पुईचे दुसरे, अशी दोन रुग्णालये वाढविली. पुढे ते पोलादपुरात विलीन करण्यात आले. अमेरिकन मिशन त्या प्रदेशातून निघून गेल्यावर महारोग्यांचे काम काही वर्षे, मी जालन्यास जाईपर्यंत, माझ्या देखरेखीखाली होते, व पुढे माझे कोंकणातील काम बेली डग्लस यांनी हाती घेतले. ह्या महारोग्यांच्या आश्रमास माझ्याबरोबर येण्यास माझ्या प्रिय पत्नीलाहि कितीतरी आनंद होत असे! त्या कामातील वैद्यकीय बाजूकडे तिचे विशेष लक्ष असे व तितकेच ते धर्मोपदेशाच्या बाजूकडेही असे, आणि त्या ठिकाणी आम्ही केलेल्या उपासना चिरस्मरणीय झाल्या.

## ११
## हरिपंतांच्या आयुष्यातील १८९६ ते १९०४ चा काळ

पोलादपुरास महारोग्यांकरता पर्णकुटी आश्रम स्थापन करून १८९५च्या उत्तरार्धात हरिपंत अलिबागेस परत आले.

तेव्हा मुंबईस भेटलेले बेंजामिन धुपकर अलिबागच्या शाळेत असल्यामुळे हरिपंत त्यांचे धर्मगुरू झाले. १८९६ साली गाठीच्या तापाची साथ गावोगाव पसरली. शाळेच्या वसतिगृहात बेंजामिन धुपकर एवढेच विद्यार्थी राहिले. हरिपंत त्याच वसतिगृहात रहात होते. 'आसपासच्या खेड्यांतून भाजीपाला विकणारे गावात येईनासे झाले. भात उकडून तोंडी लावण्यास मांसाचा रसा केला की आमचा स्वयंपाक झाला. पैकी रसा करण्याचे काम माझे होते', असे डॉ. बेंजामिन ह्यांनी आपल्या आठवणीत लिहिले आहे.

हरिपंतांची आई अजून हयात असून अलिबागेस रहात असे. त्यांचा पाठचा भाऊही तेथेच असे. पण ख्रिस्ती होण्यासाठी त्यांना १५ वर्षांपूर्वी घर सोडावे लागले तेव्हापासून त्या गृहसुखाला ते मुकले होते.

१८९६ ते १९०२ हा त्यांच्या ख्रिस्ती जीवनातील तिसरा सात वर्षांचा काळ अलिबागेस गेला. अलिबागेस विल्की ब्राऊन मिशनरी म्हणून आल्यावर हरिपंत इंग्रजी शाळेत शिक्षकाचे काम करू लागले. ते शिक्षण व्यवसायात पडले तरी धर्मोपदेश हा त्यांचा जोड-व्यवसाय होताच. शिवाय गद्यपद्य लेखनही चालू होते.

त्यावेळी मुंबईतील आम्रोळी मंडळीचे पाळक रेव्ह. माधवराव निकंबे परदेशी गेले होते आणि त्यांची जागा रिकामी होती. १८९७ च्या नोव्हेंबर महिन्यात मिशन कौन्सिलने मंडळीच्या कर्क सेशनला असे सुचवले की हरिपंतांना त्यांनी मंडळीच्या सेवेसाठी सहायक म्हणून पाचारण करावे व हरिपंतांनी उपदेशकाची सनद मिळविण्यासाठी मुंबईत राहून तयारी करावी. कर्क सेशनच्या टिपणांत ही नोंद आहे. पण पुढे हा योग का जुळून आला नाही ह्याविषयी उल्लेख मिळत नाही.

अलिबागेस घालवलेल्या ह्या तिसऱ्या सात वर्षांच्या काळात हरिपंतांनी प्रसिद्ध केलेल्या लेखांपैकी 'चुकीची दया' (१८९७), बुद्ध विष्णूचा अवतार नाहीं असें प्रतिपादन करणारा एक महत्वाचा उतारा' (१८९८), 'पर्जन्य-निमित्त अख्रिस्ती लोकांचा प्रार्थनेचा आठवडा' (१८९९), 'श्वानपूजा' (१८९९), 'स्मरणशक्तीचे चमत्कार' (१९००), 'पंजाबी आर्यसमाजाविषयी धर्मसंबंधीं मतें' (१९०१), 'गीता आणि कृष्ण' (१९०१) आणि 'उत्पत्तीच्या पुस्तकावरील एक नवी टीका' (१९०२) हे आहेत.

शिवाय हरिपंतांनी १९०१ साली स्वतःच्या अक्षरात लिहिलेले एक वहीचे पान घरच्या घरीच हाती लागले. त्यावर लिहिलेले गीत त्यांच्या हस्ताक्षराच्या ठशात ह्या संग्रहात घातले आहे. 'ख्रिस्तासाठी सर्व काही' ह्या सुप्रसिद्ध इंग्रजी चालीवरील गीताचे ते मराठी चालीवर अंजनी-गीताच्या वृत्तात रूपांतर आहे.

'प्रत्येक गुडघा प्रभु येशू ख्रिस्ताच्या नावाने टेकेल' हेच त्यांच्या ख्रिस्ती जीवनातील सेवेचे प्रथमपासून अखेरपर्यंत ध्येय होते. 'येवो भावो ठेवो अघहरणी भवतरणी प्रभुमरणी ही वसुंधरा' हेच ते ध्येय.

## १२
## अंतकाळातून अनंतकाळाकडे

१९०२ च्या नंतर हरिपंतांच्या हातून लेखन सेवा झाली नाही असे दिसते. तरी बायबल सोसायटीच्या मराठी भाषांतर कमिटीवर ते काम करीत होते. साऱ्या शक्ती एकवटून ते एकवीस वर्षे ख्रिस्तसेवा करीत गेले. पण काळ - कसल्याही कणखर वस्तूला कणाकणाने झिजविणारा काळ - बरोबर चालला होता. त्या काळापुढे हरिपंतांच्या क्षयाधीन देहाचा काय पाड लागणार? त्यांच्या शक्ती क्षीण होत गेल्या. शेवटच्या वर्ष दीड वर्षातील दिवस त्यांचे शेवटचे दिवस होते. डॉ. बेंजामिन धुपकर आपल्या आठवणीत लिहितातः

> 'मुंबईस बोरीबंदरवर त्यांनी मला भेटावयास बोलावले. हवा पालट करण्यासाठी ते निघाले होते. त्यांची प्रकृती खालावली होती. व्यथित मनाने ते मला भेटले. त्यांच्या डोळ्यांत मी अश्रू पाहिले. तीच आमची शेवटची भेट.'

ही १९०४ ची गोष्ट असावी. साताऱ्यास आपल्या थोरल्या मुलीला भेटून हरिपंत मिरजेस गेले. तेथे राहून वैद्यकीय उपचार करून पाहिले. शेवटी राहत्या घरी मरण यावे म्हणून ते अलिबागेस परत आले. ११ जुलै १९०४ रोजी त्यांनी अलिबागेस देह ठेवला आणि जीवनाचा अंतकाळ अनंत काळच्या जीवनात मिळून गेला.

हरिपंतांच्या कबरेजवळ 'प्रिय प्रभूच्या हाती सुरक्षित मी' हे गीत गाणाऱ्यांपैकी तेव्हाचे एक बालविद्यार्थी पुढे बिहार सरकारच्या स्थापत्य शाखेत काम करून सेवानिवृत्त झालेले जेम्स जॉन धुपकर आता पुण्यात रहात आहेत. ते त्या दिवसाच्या आठवणी अजून सांगतात. अनपेक्षित योगायोग असा की इतक्या वर्षांनंतर पोलादपुरास उभारलेल्या स्मारक मंदिराच्या बांधकामासाठी लागणारा नकाशा त्यांच्याच हस्ते तयार झाला.

हरिपंतांच्या मित्रपरिवारापैकी नामांकित लेखक बाबा पदमनजी ह्यांची आपले दैनंदिन अनुभव लिहून ठेवण्याची प्रथा होती. असा पन्नास वर्षांचा 'अनुभवसंग्रह' त्यांनी दोनदा खंडशः प्रसिद्ध केला, १८९४ पर्यंत ४० वर्षांचा पहिला, व १९०४ पर्यंत पुढील १० वर्षांचा दुसरा भाग. ह्या दुसऱ्या भागातील शेवटचा स्मृतिलेख 'मि. हरि गोविंद केळकर यांचा मृत्यु ११-७-०४' असा आहेः

अलिबाग येथील हे माझे प्रिय ख्रिस्ती बंधु मारण पावल्याचें दुःखदायक वर्तमान आजच आलें. यांच्या मरणानें त्यांच्या कुटुंबावर मोठा दुःखाचा डोंगर कोसळला. इतकेंच नव्हें तर ज्या मिशनाच्या संबंधानें ते काम करीत होते त्यांचा व महाराष्ट्र ख्रिस्ती समाजाचा मोठा तोटा झाला. हे अलिबाग येथील फ्री चर्च मिशनाचे प्रथम फल होत. यांनीं बहुत वर्षें तेथें प्रभूचें काम केलें. ते सुवार्तिक व शास्त्रशिक्षक होते. त्यांस कविता करण्याची बरीच शक्ति होती. ती त्यांनीं प्रभुचरणीं अर्पून अनेक वृत्तांच्या सुंदर व गोड कविता रचिल्या, त्यांत 'हो प्रसन्न मंदक्रोध वंद्य ईश्वरा' हें पद सुप्रसिद्ध असून ख्रिस्ती जनांस फार सुप्रिय आहे. 'ईश्वरभजनाचीं गीतें' ह्या पुस्तकांत त्यांचीं ११ गीतें आहेत. त्याशिवाय आणखी कविता व पत्रें ज्ञानोदयांतून प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांस पुस्तकें लिहिण्याची हौस होती, परंतु वेळ नसल्यामुळें त्यांच्या इच्छेप्रमाणें ती पूर्ण झाली नाहीं. मुंबईच्या त्राक्ट सोसायटीनें त्यांची 'त्रिवेणी' व 'प्रभावली' नांवाची दोन पुस्तकें छापलीं आहेत. हे बायबल सोसायटीच्या रिविजन कमिटीचे एकदां मेंबर होते.

मि. केळकर हे प्रभूच्या कामांत फार आवेशी व मेहनती होते. विधर्मि लोकांस उपदेश करण्यांत व त्यांच्याशीं धर्मसंबंधीं भाषणें करण्यांत फार निष्णात होते. त्यांस हिंदु धर्माची व ख्रिस्ती धर्माची चांगली माहिती होती. हें आमचे बंधु मुंबईस आले म्हणजे बहुधा आमच्या घरीं आल्याशिवाय राहत नसत. त्यांच्या भेटींतल्या गोष्टी म्हटल्या म्हणजे त्यांच्या कामासंबंधीं असायच्या. त्या ऐकायास मला कधीं कंटाळा येत नसे. त्यांचें लक्ष प्रभूच्या कामांत केवढें होतें हें त्यांच्या बोलण्यावरून समजून येई.

प्रिय प्रभूनें आतां त्यास अक्षय विश्रांतीच्या स्थळीं नेलें. त्यांच्यासाठीं आम्हांला प्रार्थना करणें नको. त्यांच्या दुःखित व उघड्या पडलेल्या कुटुंबाचें प्रिय प्रभु सांत्वन व संभाळ करो. ख्रिस्ताच्या ह्या विश्वासू सेवकानें अलीबाग प्रांतांत जें जीवनाचें बीज पेरिलें आहे, त्याजवर पवित्र आत्म्याची सुवृष्टि होवो, आणि त्याला अमर आत्म्याचें तारणरूप बहुत पीक येवो.

परमेश्वराच्या दृष्टीने त्याच्या भक्तांचे मरण अमोल आहे. (स्तोत्र ११६:१५)

## १३
## पोलादपूर (१९५४): स्मारक-मंदिराचे समर्पण

साठ वर्षे होऊन गेली. पोलादपूरच्या आश्रमात महारोग्यांची सेवा-शुश्रुषा अव्याहत चालू आहे आणि रोगी होऊन आश्रमात आलेले पण निरोगी होऊन बाहेर पडलेले कित्येक जण आज आपापल्या घरी सुखाने नांदत आहेत. पण ६० वर्षांपूर्वी अशा दुःखी निराश्रित लोकांची काय अवस्था होती! घरातून उठलेला, गावातून घालवलेला, आपल्याच रोगाने विद्रूप होऊन जगाला अनोळखी झालेला असा एकेक हताश जीव दोशोधडीस लागत असे. कोरडा तुकडा आणि कटोराभर पाणी मिळाले तर दिवस निभावला असे मानून दयेची याचना करणाऱ्या ह्या अनाथ अपंगाला तेवढ्या भिकेसाठी सुद्धा गावात मज्जाव केला जाई. ज्यांना पाण्याचा ओलावा मिळणें कठीण त्यांना प्रेमाचा ओलावा कोण देणार? जगाला देवाच्या प्रीतीचे दान करणारा ख्रिस्त 'माझी इच्छा आहे, शुद्ध हो' अशा अभयवचनाने महारोग्यांशी बोलणारा ख्रिस्त.

त्या ख्रिस्ताच्या सुवार्तेचे सेवक डॉनल्ड मिचेल व हरिपंत केळकर ह्यांच्या सेवेचे स्मारक - पोलादपूरचे नवे उपासनामंदिर - ३० ऑक्टोबर १९५४ रोजी देवसेवेसाठी समर्पण करण्यात आले. डॉ. मिस ई. जे. के. ह्युअट ह्यांनी लिहिलेल्या आणि ज्ञानोदय मासिकाच्या जानेवारी १९५५ च्या अंकात प्रसिद्ध झालेल्या इंग्रजी लेखाचा अनुवाद खाली दिला आहे.

'सगळे रस्ते रोमकडे जातात' असे म्हटले आहे. आणि खरोखर १९५४ ऑक्टोबर ३० रोजी पश्चिम भारतातील सगळे रस्ते - लेपर मिशनचे कुष्टघाम जेथे आहे - त्या पोलादपूरकडे जात होते, असे दिसून आले. पश्चिम घाट आणि समुद्र यांच्या मध्यंतरी, पर्वतपायथ्यांच्या टेकड्यांमध्ये, झाडांत गुरफटलेल्या ह्या दूरच्या वसाहतीकडे त्या दिवशी बिहारमधील पुरुलियाहून, हैद्राबाद संस्थानातील जालन्याहून, पुण्याहून, मुंबईहून, आणि इतर अनेक ठिकाणांहून लोक येत होते. पोलादपूर आश्रमाचे जे वैद्यकीय अधिकारी आहेत त्यांचे वडील व आई, डॉ. कॅनन ए. पी. दास व श्रीमती दास हे तर दूरवर असलेल्या पंजाबमधून अगोदरच आले होते. शेवटच्या टेकडीवरून आमच्या गाड्या वेगाने खाली येत असता फाटकापाशी वळण घेण्याच्या अगोदर, ज्या नवीन मंदिराच्या समर्पणासाठी आम्ही त्या दिवशी आलो होतो त्या मंदिराचा उंच व शिरोभागी क्रूस धारण करून झाडांमधून वर आलेला मनोरा आमच्या दृष्टीस पडला.

अगदी जवळच्या खेड्याहूनही अर्धा मैल दूर असलेली ही वसाहत तिच्यातील दोनशे रहिवासी, रुग्णालय, औषधालय, शाळा व घरे ह्या सर्वांमुळे एक खेडेच झाली आहे. पण हिंदुस्थानातील खेड्यांत न आढळणारा विस्तृतपणा आणि व्यवस्थितपणा तिच्यात आहे. पाश्चिमात्य दृष्टीला ती एखाद्या खेड्यासारखी नव्हे तर जमीनजुमल्याच्या वाडीसारखी दिसणारी आहे. पुण्यापासून शंभर मैलांचा प्रवास करून वेगात आलेल्या आमच्या गाड्या 'सुस्वागतम्' ची लाल पाटी लावलेल्या फाटकात शिरून, पांढऱ्या पताकांच्या ओळींमधील मार्गावरून, रेती पसरलेल्या एका खुल्या जागेत येऊन उभ्या राहिल्या.

एका कडेला एल-अक्षराच्या आकारासारखे नवे शुभ्र मंदिर होते. त्याचा मनोरा ह्या अक्षराच्या उभ्या रेघेसारखा होता. आणि दूरवर डाव्या कडेला हिंदी पद्धतीप्रमाणे वाऱ्यासाठी उघड्या बाजू ठेविलेले दालन होते. मंदिराच्या समोरच्या बाजूस रुग्णाईतांची पांढरी, ठेंगणी लहान लहान घरे आहेत आणि उडव्या बाजूस 'मिशनरी नर्स' चे लहान घर आहे. जवळच्या खालच्या आवारात डॉ. दास व त्यांचे कुटुंब यांना राहण्यासाठी रुग्णाईतांनी स्वतः बांधलेला मोठा बंगला आहे. ह्या बंगल्यात सत्तर एक पाहुणे स्वागतकारक भोजनासाठी एकत्र जमले आणि तीन वाजता मंदिराचे उद्घाटन व समर्पण करण्याचा - ज्यासाठी आम्ही आलो होतो - तो महत्त्वाचा क्षण आला.

ज्या दालनाचा उपयोग त्या दिवसापर्यंत मंडळीच्या उपासनेसाठी होत असे त्यांत प्रथम एकत्र जमून आम्ही नव्या मंदिराकडे रांगेने चालत निघालो आणि श्रीमती दास व मिशनरी नर्स मिस मॅके ह्या दोघी व आश्रमातील मुले पुढे चालत असतां, 'यात्रिका, प्रभो, मला तू या रानात चालवी', हे मराठी गीत आम्ही गात गात गेलो. मंदिराच्या दरवाजापाशी येऊन उजवीकडच्या व डावीकडच्या जागी, गाणारे उभे राहिले असता कॅनन दास यांनी दरवाजाची किल्ली फिरवली.

मंदिरात उच्चारलेले पहिले शब्द उपासनेच्या प्रार्थनेचे व 'आतांपासून ह्या मंदिरांत येणाऱ्या सर्वांना शांति मिळो' अशा विनंतीचे होते. मग उत्सुक व आदरभरित मंडळीने मंदिरात प्रवेश केला. रुग्णाईत स्त्रिया डावीकडे चटईवर, पुरुष उजवीकडे, मुले पुढील बाजूस व पाहुणे मागील बाजूस असलेल्या बाकांवर असे

सर्वजण बसले. मराठी भक्तिगीतांपैकी दोन देशी चालीवरची होती व मंडळी ती आवशाने गात असता टाळ व मृदंग यांच्या ठेक्यावरचा ताल चालू होता. पिता, पुत्र व पवित्र आत्मा यांच्या नामाने समर्पित करते वेळी आचार्य व मंडळी यांनी आळीपाळीने म्हणावयाची प्रार्थना, जालना येथील चर्च ऑफ स्कॉटलंड मिशनचे रेव्ह. आर. टी. एस. मिलर यांनी सादर केली व 'आम्ही हे मंदिर समर्पित करतो' अशा उद्गारांनी मंडळीने साथ दिली. पुण्याच्या सेंट जॉन शाळेचे मुख्याध्यापक व ह्या कुष्टधामाचे मानवंत, प्रमुख चालक डॉ. डंकन फ्रेझर यांनी लंडन, स्कॉटलंड, कॅनडा, ह्या व इतर ठिकाणांहून आलेल्या तारा उपासनाक्रमानुसार वाचून दाखविल्या. 'इफिसकरांस पत्र' यांतून वाचलेला शास्त्रभाग जे दूर होते त्यांस व जे जवळ होते त्यांस शांतीची सुवार्ता व प्रभूच्या ठायी रचल्या जाणाऱ्या मंदिरांत 'तुम्ही एकत्र रचलेले आहा' ही सुवार्ता सांगणारा होता.

एकसष्ट वर्षांपूर्वी ज्या ख्रिस्तानुयायी हरिपंत केळकरांनी पोलादपूरच्या रस्त्याच्या एका बाजूस गवताच्या साध्या झोपड्या बांधून, आपल्या सहानुभूतीने व आवेशाने पहिल्या महारोग्यांची सेवा केली, त्यांच्या एका मुलाने हा शास्त्रभाग वाचला. लेपर मिशनचे भरतांतील चिटणीस मि. डब्ल्यू. बेली ह्यांनी भाषण केले. जगभर पसरलेल्या मित्रांकडून ह्या कामी देणग्या मिळाल्या असून ह्या मंदिराविषयी दूरदूरच्या ठिकाणी आस्था फैलावलेली आहे हे त्यांनी सांगितले. ह्यांपैकी टोरॉन्टो (कॅनडा) येथील हॅमिल्टन बॅप्टिस्ट चर्चचा व मंदिरातील व्यासपीठासाठी देणगी देणाऱ्या स्कॉटलंडमधील एका स्त्रीचा उल्लेख येथे करता येईल. ह्या ठिकाणी खूण दाखविण्याचे - अर्थात् मंदिराची खूण दाखविण्याचे - व त्याचप्रमाणे पाणी पुरवठ्याचे काम करणारा जो मंदिराचा मनोरा तेथील लोकांसाठी ५००० गॅलन पाण्याचा साठा करीत आहे त्या मनोऱ्याचाही उल्लेख करण्यात आला. किती यथार्थ खूण! मनुष्याची शारीरिक गरज भागविण्यास लागणारे पाणी व शोमरोनातील विहिरीजवळ असलेल्या स्त्रीशी आपला प्रभू ज्याविषयी बोलला ते आत्मिक पाणी ह्या एकाच इमारतीतून वाहात आहे.

समर्पणाची उपासना चालू असता प्रभुभोजन करण्याचे मेज, प्रवचन करण्याचे व्यासपीठ, शास्त्रवाचन करण्याचे उभे मेज व मंदिराचे दरवाजे अशा लाकडी वस्तूंच्या रंगाशी सुसंगत दिसणाऱ्या, फिका बदामी रंग दिलेल्या गाभाऱ्याच्या चर्मरंगी भिंती अशा कित्येक आकर्षक गोष्टींकडे निरीक्षक नेत्र लागल्याशिवाय राहिले नाहीत. मंदिराच्या बाकीच्या भागाच्या बाजूच्या भिंती, छत, खांब व खिडक्या यांचा रंग पांढरा शुभ्र होता. ह्या खिडक्या सुज्ञ विचारांती काचेच्या न करता नक्षीदार बांधकामाच्या व मध्येमध्ये हवा खेळण्यासाठी भरपूर वाव ठेवलेल्या जाळीच्या केलेल्या होत्या. ही नक्षी अशा प्रकारची होती की, प्रत्येक खिडकीच्या मध्यभागी क्रूसाचा आकार आला होता. गालीलातील कुष्ठरोग्यांसाठी दोन हजार वर्षांपूर्वी ज्याची प्रीति व आरोग्यदायी शक्ति पाझरली होती व पश्चिम भारतात चालू काळी असलेल्या त्यांच्यासारख्यांसाठी अजून पाझरत आहे त्याचे दृश्य स्मारक म्हणून, प्रभुभोजन-मेजाच्या मागील भिंतीत आरपार कोरून व त्यात काच बसवून केलेला क्रूस, सर्व मंदिरात महत्त्वाच्या स्थानी होता.

ह्या उपासनेनंतर पाहुण्यांना चहापान व रुग्णाईतांना जिलबी मिळाली. कांही वेळाने, अंधार पडल्यानंतर लुकलुकणाऱ्या मंद ज्योति दिसू लागल्या. मंदिराच्या सपाट छपराच्या काठावरून लावलेल्या, (दहा कुमारींनी आपल्याबरोबर नेलेल्या दिव्यांपेक्षा निराळ्या नसलेल्या) सुमारे पाऊणशे पणत्या सभोवारचा अंधार भेदून मंदिराची रूपरेषा दाखवूं लागल्या. दूरच्या अंतरावरील मंद ज्योतींच्या खऱ्याखुऱ्या लखलखीत प्रकाशाने आमच्या पावलांना तिकडची गति दिली. त्या ठिकाणी असलेल्या पोहोण्याच्या हौदावरील हजारो लहान लहान पणत्यांनी तेथील गडद पाण्यावर लखलखीत प्रकाशाची आरास केली होती.

हौदाच्या प्रत्येक बाजूस असलेल्या चारचार पायऱ्यांपैकी प्रत्येकीवर पणत्यांची एक ओळ लावली होती. पाण्याच्या संपूर्ण सभोवताली पणत्या होत्या व मध्यभागी उभे राहण्यासाठी असलेल्या सपाट चौथऱ्यावरच्या पणत्यांनी 'सुस्वागतम्' ची अक्षरे बनविली होती. एक लहानुली होडीसुद्धा आपल्या वाट्याच्या पणत्या घेऊन पाण्यावर तरंगत होती. अंगणाच्या मध्यभागी पेटविलेले दारुकाम आपल्या चमकत्या ठिणग्यांनी व जळत्या बाणांनी उत्सवाच्या चैतन्यात भर घालीत होते.

रात्रीच्या जेवणानंतर रुग्णाइतांनी दोन नाटिकांचे प्रयोग करून पाहुण्यांचे मनोरंजन केले. पहिल्या नाटिकेत दरवडेखोरांनी गांठलेला एक - ख्रिस्ती साधु असलेला - गुरु दाखविला होता, पण त्या गुरूचा प्रामाणिकपणा व चांगुलपणा इतका स्पष्ट होता व त्याचे बोलणे इतके सुविचाराचे होते की, चोरांच्या परिवर्तनात नाटिकेचा शेवट झाला. दुसरी नाटिका एका ब्राह्मणाच्या घरी अन्नासाठी भिक्षा मागण्यास गेलेल्या एका अस्पृश्याची कथा होती. ब्राह्मणाने भिक्षेकऱ्याला खुषीने मदत दिली असती पण त्याच्या बायकोने नकार दिला. तरी नकार देणाऱ्या रूढ समजुतीपेक्षा सहानुभूतीचा जोर बलवत्तर ठरला व नाटिकांच्या पद्धतीप्रमाणे ह्या नाटिकेचा शेवट सुखदायक झाला. त्यानंतर पुरुष व मुलगे यांचा मिळून एक देशी पद्धतीचा नाच झाला व त्या नाचणाऱ्यांचा अनिर्बंध उत्साह व त्यांनी न दमता धरलेले चक्राकार फेरे पाहून इतक्या चपळ हालचाली करणाऱ्या ह्या शरीरांना महारोगपीडा होत आहे ह्यावर कोणालाही विश्वास ठेवणे अशक्यप्राय झाले असते.

दुसऱ्या दिवशी, रविवारी, ह्या मंदिरातले पहिले प्रभुभोजन झाले. त्याच्या अगोदर नेहमीप्रमाणे उपासना झाली व ती ह्या प्रसंगी मि. मिलर व डॉ. फ्रेझर यांनी चालविली. प्रभुभोजनासाठी सुमारे पन्नास जण राहिले. त्यांच्यापैकी जवळजवळ निम्मे रुग्णाईत व निम्मे पाहुणे होते. डॉ. फ्रेझर यांनी वडील म्हणून, जेव्हा प्रत्येक रुग्णाइताच्या तळहातावर भाकर ठेवली व प्रत्येकाजवळ खाली वाकून प्रत्येक व्यक्तीच्या पेल्यात द्राक्षरस ओतला, तेव्हा त्यात असे काही विशेष दिसले की, ज्याने शिष्यांचे पाय धुतले व ते रुमालाने पुसले त्याचे व्यक्तिमत्त्व स्पष्टपणे मनापुढे आले. त्या उपासनेत 'निरोगी व रोगी, अशक्त व सशक्त' असे सगळे 'वरच्या खोली'मधून व 'कॅलव्हरी'वरून पाझरलेल्या प्रीतीत एकत्र आणले गेले.

हा लेख लिहिला त्या दिवशी सकाळी वाचलेले गीत, ब्लेकचे प्रसिद्ध गीत होते,

"And did those feet in ancient time
walk upon England's mountain green!"

ह्याच्या दोन कडव्यांतील प्रत्येकाच्या शेवटी यरुशलेमचे एकेक चित्र आलेले आहे. पहिल्या कडव्यातील यरुशलेम अंधकारमय सैतानी कारखान्यात बांधावयाचे आहे. एकसष्ट वर्षांपूर्वी केळकर ज्यांचे मित्र झाले त्या महारोग्यांची स्थिति त्यांना खरोखर सैतानासारखी दिसली असेल. त्या दिवसांत रोग व निराशा हे महारोग्यांचे कधी न सोडणारे सोबती - मरणात होणारा निराशामय शेवट येईपर्यंत कवटाळून राहणारे सोबती होते. घरांतून व कुटुंबांतून घालवून दिलेले हे महारोगी, माणसांना नकोसे होते व त्यांच्या दृष्टीने ते देवाला किंवा देवांना नकोसे होते. अशा परिस्थितीत केळकर जे करू शकले ते थोडेच होते, पण त्यांनी दया अणि प्रीति आणि सेवा यांतून देता येईल ते सगळे दिले. आणि त्यांनी घातलेल्या पायावर आजचे नवीन यरुशलेम ह्या 'हिरव्या नंदनवनात' उभारले गेले आहे. सपाट हिरवळीच्या जागा, कडेने लावलेल्या वनस्पतींच्या रेखीवपणे कातरलेल्या ओळी, रेती पसरलेल्या पायवाटा, नीटनेटकी व भिंतीवर हातांनी रंगविलेल्या नक्षीची लहान लहान घरे - असे हे लहानसे जग आहे. येथे चेंडू खेळण्याची अंगणे, पोहण्याचा हौद, कोंबड्यांचे

आवार, भाजीपाल्याच्या बागा व अन्नधान्याची शेते आहेत. ह्या बाह्य गोष्टींप्रमाणेच दृष्टोत्पत्तीस येणारी, आनंद, विश्वास, आशा, आणि मित्रभाव यांची - आत्मिक भावना ह्या वसाहतीवर व वसाहतीत वास करीत आहे. जुने निराशेचे दिवस गेले आहेत. गेल्या वर्षी अठरा रोगी निरोगी होऊन येथून गेले. पूर्ण निरोगी स्थितीत परत येण्यास वाव नसला किंवा विलंब लागत असला तरी ज्यांत राहता येईल असे येथे कुटुंब आहे. आणि स्वतःचा उपयोग करण्यासाठी येथे बागेत व शेतात, शाळेत व औषधालयात काम आहे. आनंद करण्यासाठी संगीत, नाट्य आणि नृत्य आहे. आणि उपासना व उपकारस्मरण करण्यासाठी आता हे मंदिर आहे. विचारविनिमय, काम आणि प्रार्थना करीत असता मागे गेलेल्या साठ वर्षांनंतर जेथे त्याचे वैभव प्रकट करता येईल, त्याची स्तुति गाता येईल आणि शब्दांनी व पवित्र संस्कारांनी त्याची प्रीति प्रसारित करता येईल, असे मंदिर, देवाचे घर व देवासाठी घर, आपल्या जीवनाच्या केंद्रस्थानी आहे. ह्या खऱ्या गोष्टीने पोलादपुरास जो आनंद झाला होता त्याचे द्योतक ह्या दोन दिवसांतील प्रसंग, शोभेचे दारूकाम व रोषणाई, लाल पाट्या व पांढऱ्या पताका, नाटिका व नाच, चहापान व सहभोजन ही सारी होती, ही जाणीव प्रेरणा देणारी झाली. क्रूसावर मोडलेल्या शरीराची सुवार्ता सांगणारी भाकर व द्राक्षरस ख्रिस्तप्रभूने दोन हजार वर्षांपूर्वी यरुशलेम येथे वरच्या खोलीत दिली व ऑक्टोबरच्या रविवारी सकाळी पोलादपूर येथे पुन्हा दिली त्यामुळेच महारोगपीडितांची वसाहत व नवे उपासना मंदिर ही आज येथे उभी आहेत.

-------------